# नवभारत

वर्ष २१ वे ]  डिसेंबर १९६७  [ अंक ३

घेरावो– स्वरूप व परिणाम अर्थात् सर्वनाश : : वा. रा. जवाहिरे
तत्त्वचिंतक जवाहरलाल नेहरू : : : : डॉ. ग. ना. जोशी
गांधीवाद आणि मराठी कादंबरी : : : : चंद्रकांत बांदिवडेकर
परकीय मदत : प्रा. सौ. चंद्रा दलाया, अनुवादक सौ. अनुराधा आचार्य
वेदांतील स्वरांविषयी काही विचार : : : : प्रा. म. दा. साठे
पवनार येथील एक अप्रकाशित शिलालेख : : : प्रा. म. शं. वाबगावकर
भाषिक समस्या : एक अभ्यास : : : : प्रा. गो. ग. कुलकर्णी
सार-संकलन— विध्वंसक; पाश्चिमात्त्य भांडवलाला बगल; चीनचे नैतिक धैर्य; दुसऱ्या दिवशी सकाळी.

वार्षिक वर्गणी ९ रु. ]  [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका











नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचे मासिक

वर्ष एकविसावे
अंक तिसरा

# नवभारत

डिसेंबर
१९६७

( महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळ पुरस्कृत )

संपादक-मंडळ

प्रा. वि. म. बेडेकर—प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक

| | | |
|---|---|---|
| घेरावो– स्वरूप व परिणाम अर्थात् सर्वनाश | वा. रा. जवाहिरे | १–७ |
| तत्त्वचिंतक जवाहरलाल नेहरू : १ : | डॉ. ग. ना. जोशी | ८-२२ |
| गांधीवाद आणि मराठी कादंबरी | चंद्रकांत बांदिवडेकर | २३–३० |
| परकीय मदत | प्रा. सौ. चंद्रा दलाया, अनुवादक– सौ. अनुराधा आचार्य | ३१–३५ |
| वेदांतील स्वरांविषयी काही विचार | प्रा. म. दा. साठे | ३६–४१ |
| पवनार येथील एक अप्रकाशित शिलालेख | प्रा. म. शं. वाबगावकर | ४२–४६ |
| भाषिक समस्या : एक अभ्यास | प्रा. गो. ग. कुलकर्णी | ४७–५९ |
| सार-संकलन — विध्वंसक; पाश्चिमात्त्य भांडवलाला बगल; चीनचे नैतिक धैर्य; दुसऱ्या दिवशी सकाळी. | | ६०–६४ |

वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हे मासिक श्री. म. शं. साठे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा– मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि० सातारा )

३ चौकशी : श्री. बा. वि. कोनकर
१८८ एफ्, भीमराववाडी, मुंबई २
फोन नं. ३५४८५४

वा. रा. जवाहिरे

# घेरावो– स्वरूप व परिणाम अर्थात् सर्वनाश

## (१) कलकत्ता हायकोर्टाचा निर्णय

कलकत्त्याच्या जय इंजिनिअरिंग वर्क्स व बेंगाल इनॅमल वर्क्स या दोन कारखान्यांतर्फे देण्यात आलेल्या भिन्न अर्जावर माहे सप्टेंबरमध्ये निर्णय देऊन कलकत्ता हायकोर्टाच्या विशेष न्यायासनाने घेरावोस बेकायदा ठरवले आहे. दि. २७ मार्च, १९६७ च्या एका परिपत्रकाने पश्चिम बंगाल सरकारने पोलिस खात्यास असा आदेश दिला होता की, मजूर मंत्र्यांच्या अगर मजूर खात्याच्या संचालकांच्या पूर्व परवानगीशिवाय घेरावो व इतर कामगार तंटयात पोलीस खात्याने पडू नये. दि. १२ जून १९६७ रोजी देखील असेच एक परिपत्रक या सरकारकडून काढण्यात आले होते. ही दोन्ही परिपत्रके वरील निर्णयाने हायकोर्टाने बेकायदा ठरवली असून, असा हुकूम देण्याचा सरकारला कायद्याने अधिकार नाही. क्रिमिनिल प्रोसिजर कोड व पोलीस कायदे या नुसार पोलीसांनी अशा प्रकरणी अंमलबजावणी केली पाहिजे आणि त्याप्रमाणे पोलीसांनी अंमलबजावणी न केल्यास ते कोर्टास जबाबदार राहतील व कायद्याने शिक्षेस पात्र ठरतील, असाही निर्णय हायकोर्टाने या प्रकरणी दिला आहे. हायकोर्टाने असेही म्हटले आहे की, घेरावो म्हणजे बेकायदा अडवणूक (रॉंगफूल रिस्ट्रेंट) व बेकायदा कैद (रॉंगफुल कन्फाइन्मेंट) असल्यामुळे, घेरावो हा कायद्याने गुन्हा ठरतो, आणि म्हणून घेरावोने अपाय झालेल्या व्यक्तीस साहाय्य देणे किंबहुना हा गुन्हा घडू न देणे हे पोलीसांचे कर्तव्य आहे.

## (२) घेरावोची काही उदाहरणे

कारखान्यांचे मालक, संचालक अगर वरिष्ठ अधिकारी यांचे भोवताली असंतुष्ट कामगार घेरा घालतात आणि त्यास कचेरीमधून बाहेर जाऊ देत नाहीत. हे असे तासन् तास चालू राहते आणि त्यांची मागणी मान्य केल्याखेरीज अगर पोलीसांनी मदत करून घेरा उठविल्याखेरीज हा घेरा उठविला जात नाही. या घेरावोने भारतात, विशेषतः पश्चिम बंगाल प्रदेशात अनेक अत्याचार केले आहेत. घेरा घातलेल्या व्यक्तींना बाहेर जाण्यास प्रतिबंध केला जातो एवढेच नव्हे, तर त्या व्यक्तीवर हल्ले व अत्याचारही केले जातात. दि. ५.८.६७ च्या टाइम्स ऑफ इंडिया-मध्ये 'घेरावो ॲण्ड ऑल दॅट' या मथळचाखाली एक लेख आला असून त्यात घेरावोची काही घडलेली उदाहरणे नमूद केली आहेत. त्यापैकी काही पुढील-प्रमाणे आहेत.

(अ) एका कारखान्यात काही वरिष्ठ अधिकाऱ्यांवर ८ ते १० तास घेरा घालण्यात आला, त्यांच्यावर निर्दयपणे हल्ला करण्यात आला, व त्यांना मोठ्या प्रमाणात जखमा करण्यात आल्या. (ब) दुसऱ्या एका ठिकाणी १५२ तास घेरा चालू होता. त्याकाळात घेरा घातलेल्या अधिकाऱ्यांना खाद्य व पेय नाकारण्यात आले, अनेक प्रकारे त्यांचा छळ करण्यात आला व मानहानीही करण्यात आली आणि त्यातील एकजण तर हृदयविकाराच्या झटक्यानेच मरण पावला. (क) एका कारखान्यात एका इलेक्ट्रिक इंजिनियरवर एक हजार कॅन्डल शक्तीचे चार दिवे रोखून लावले गेले होते. बळजबरीने यंत्रे ताब्यात घेणे, त्यांची नासधूस करणे, नागरिकांचे खाजगी जागेत अतिक्रमण करणे, व्यवस्थापक वर्गास पळवून नेणे, ते चुकतील अशा रीतीने त्यांना सोडून देणे, कारखान्यांच्या आवारापासून तांत्रिक नोकरवर्गाचा पाठलाग करणे असे घेरावोचे विविध प्रकारचे अत्याचारी स्वरूप आढळास व अनुभवास आले आहे.

याच विषयावर इंडियन आयर्न ॲण्ड स्टील कंपनीचे अध्यक्ष सर बिरेन मुकर्जी यांनी कंपनीच्या भागीदारांच्या सर्वसाधारण सभेत सांगितलेली हकीकत पुढीलप्रमाणे आहे. गेल्या मार्चपासून कंपनीत मोठ्या प्रमाणांवर सुमारे पन्नास घेरावोचे प्रसंग झाले.

प्रत्येक वेळा नवा व कुटिल असा कार्यक्रम युनियनच्या पुढाऱ्यांच्या आदेशाप्रमाणे आखण्यात येतो की, त्यातून कारखाना बंद पडावा, लुळापांगळा व्हावा; पाणीपुरवठा तोडणे ही एक लहानशी गोष्ट दिसते, तथापि त्यायोगे कोटयवधि रुपयांच्या यंत्रसामग्रीची खराबी व मोडतोड, पाण्याच्या अभावी सबंध शहराचे आरोग्य धोक्यात आणणे या गोष्टी केल्या जातात. लोखंड व पोलाद वितळताना अगर एकंदर यंत्राची कामे चालली असताना त्या भोवताली पाणी पुरवून उष्णता कमी करावयाची असते. पाण्याच्या अभावी यंत्रांची नादुरुस्ती घडते. या कारवाईमागचे उद्दिष्ट केवळ मोडतोड हे आहे. बाहेरची माणसे देखील आत घुसून मोडतोड करतात, कामे बंद पाडतात. बॉम्ब, भाले, काठ्या, घेऊन दोनशे लोकांचा एक जमाव भिंतीवरून चढून आत उतरला, झाडे तोडून रस्त्यावर टाकली, बाहेरून आत कामावर येणाऱ्यांचा मार्ग रोखला व कारखान्यात कामावर असलेल्या कामगारांची मारपीट चालवली. पोलिसांकडे कळवता, त्यांचे उत्तर आले की, कलकत्त्याहून आम्हास आदेश आलेला नाही, या बाबतीत प्रश्न कामगारांचा नव्हता, बाहेरच्यांचा होता. आत घुसलेल्या दोनशे लोकांनी कामगारांना आत कामावर जाण्यास प्रतिबंध केल्यानंतर कामावर आम्ही काही केल्या जाणार असे कामगारांनी आग्रह धरल्यावर मग कायदा व सुव्यवस्था याची पोलिसांना आठवण झाली व त्यांनी कंपनीच्या कामगारांनाच अटक करण्याची धमकी दाखविली. त्यांचा गुन्हा काय तर कायदेशीरपणे आपल्या उद्योगावर जाण्याचा. . . . इत्यादी.

असे हे घेरावोचे अत्याचारी, अनैतिक व कायदेविरोधी स्वरूप अनुभवास आलेले आहे.

## (३) घेरावो हा फौजदारी गुन्हा व व्यक्तिस्वातंत्र्याची गळचेपी

कोणी असा दृष्टिकोन मांडतात की, शांततामय घेरावो ही कायदेशीर बाब होय. तथापि वरील उदाहरणांवरून व वृत्तपत्रांमधून आलेल्या इतर अनेक उदाहरणांवरून असे स्पष्टपणे दिसून येते की, घेरावो शांततामय असच शकत नाही व कायदेशीर तर नाहीच नाही. घेरावो-वाल्यांनी इतर काहीही अत्याचार केले नाहीत तरी काही व्यक्तींना मोठ्या समुदायाने तासन् तास अगर दिवसन् दिवस घेरून ठेवणे, त्यांना खाण्यापिण्याला अगर विश्रांतीला मोकळिक न देणे, त्यांना नैसर्गिक विधी करण्यास सवड न देणे आणि त्यांना खाजगीपणा न पुरविणे या गोष्टी निश्चितच अत्याचारी व अशांततामय आहेत हे दिसून येते. यामुळे घेरलेल्या व्यक्तींच्या व्यक्तिस्वातंत्र्यावर सर्व प्रकारे अतिक्रमण व गळचेपी घडते. तसेच हायकोर्टाने आपल्या निर्णयात म्हटल्याप्रमाणे घेरलेल्या व्यक्तींवर या कृत्याने बेकायदा बंदी (रॉंगफुल रिस्ट्रेंट) व बेकायदा कैद (रॉंगफुल कन्फाइन्मेंट), की जे फौजदारी गुन्हे आहेत, ते लादले जातात. यास्तव शांततामय, कायदेशीर, अगर नैतिक असे काही अंग घेरावोत आढळून येत नाही.

## (४) घेरावो आणि सत्याग्रह

घेरावो हा सत्याग्रह आहे असे घेरावोवाल्यांचे म्हणणे आहे. तथापि दोन्ही मध्ये साम्य फारच अल्प असून फरक फारच मोठा आहे. ज्याच्याविरुद्ध सत्याग्रह केला जातो, त्याला काही त्रास न देता स्वतःला क्लेश करून घेऊन त्याद्वारे त्याचे मतपरिवर्तन अगर हृदय-परिवर्तन घडवून त्याचेकडून अनुकूल निर्णय मिळवावयाचा अशी सत्याग्रहातील कृती असते. या उलट, ज्याच्याभोवती घेरा घातला जातो, त्याला पीडा करून त्या पीडेच्या दडपणाने त्याचेकडून घेरावोवाले अनुकूल निर्णय मिळवितात. दोन्हींमध्ये दडपण असते, परंतु पहिल्यात आत्मक्लेषाचे दडपण असते, तर दुसऱ्यात परपीडनाचे दडपण असते. याखेरीज सत्याग्रहातील कायद्याचे उल्लंघन हे केवळ प्रतीकात्मक अगर तांत्रिक उल्लंघन असते. उदाहरणार्थ, सभाबंदीचा हुकूम अगर मिरवणूक बंदीचा हुकूम मोडणारे कार्यकर्ते प्रतीकात्मकरीत्या हुकूम मोडतात. पोलीस त्यांना अडवतात, धरतात व थोडा वेळ दुसरीकडे नेऊन सोडून देतात. या उलट घेरावोमधील कायद्याचे उल्लंघन हे भावात्मक, संपूर्ण अगर खऱ्या अर्थाने उल्लंघन असते; अर्थात् सत्याग्रहातील या प्रतीकात्मक उल्लंघनामधूनच घेरावोतील संपूर्ण उल्लंघन परिणत झाले आहे ही गोष्ट मात्र या तुलनेमधून प्रकट होते.










## (५) घेरावो म्हणजे कायदा हातात घेणे

घेराबोची घडलेली जी निरनिराळी उदाहरणे सुरुवातीस नमूद केली आहेत ती लक्षात घेता आणि घेरावोचे स्वरूप जे नंतर वर्णिले व चर्चिले आहे ते लक्षात घेता, ज्यांचे भोवती घेरा घातला जातो, त्यांचेकडून आपल्या मागणीवर संमती मिळविण्याकरता त्यांचेवर दीर्घ मुदतीच्या घेऱ्याचे रूपाने बेकायदा बंदी व कैद लादली जाते. म्हणजे सामोपचाराने, वाटाघाटीने अगर रीतसर कायदेशीर इलाज न करता घेरावोवाल्यांकडून मागणीच्या मान्यतेसाठी स्वतःचे हातात कायदा घेतला जातो. देशामध्ये लोकशाही असो, हुकूमशाही असो अगर अन्य कोणत्या स्वरूपाची राज्यव्यवस्था असो, कायदा व सुव्यवस्थेची अंमलबजावणी करण्याचे काम सरकारचे असते. त्यामुळे कोणतीही गोष्ट साध्य करावयाची असल्यास ती कायद्याच्याच मार्गाने साध्य करावयाची असते. आणि सरकारचे काही धोरण अगर कृत्य नापसंत असल्यास त्याविरुद्ध फक्त सनदशीर व शांततामय अशी निदर्शने करावयाची असतात. खेरीज राजवट लोकशाहीची असल्यास सार्वत्रिक निवडणुकीच्या वेळेस सरकार बदलण्याच्या दृष्टीने मतदानाच्या हक्काचा रीतसर वापर करता येतो. या मुद्यावर निकालपत्रात हायकोर्टाचे न्यायाधीश म्हणतात : " राज्यघटना व देशातील कायदे यांची प्रतिष्ठा सर्वांनी ठेवली पाहिजे. एकदा कायदा केल्यानंतर त्यात कमीजास्त करणे किंवा त्याच्या अंमलबंजावणीत हस्तक्षेप करणे राज्यपाल, मंत्रिमंडळ किंवा अंमलबजावणी खात्यातील कोणी अधिकारी यांच्या हाती राहत नाही. "

म्हणून कोणीही कोणत्याही कामासाठी कायदा हातात घ्यावयाचा नसतो. अन्यथा समाजाचे स्वास्थ्य बिघडते, संरक्षण धोक्यात येते, आणि गोंधळ व अराजक माजते. अर्थात देशामध्ये अशी परिस्थिती निर्माण व्हावी असाच कम्युनिस्ट विचारसरणीचा दृष्टिकोन असल्यामुळे त्या विचारसरणीने भारावलेल्या लोकांकडून अशी समाजविघातक कृत्ये केली जातात. सहाजिकच अशा कृत्यांनी निर्माण होणाऱ्या गोंधळामुळे व अराजकामुळे लोकशाही यंत्रणा धोक्यात येते व खिळखिळी होते. आणि पर्यायाने लष्करी हुकूमशाहीच्या अगर कम्युनिस्ट हुकूमशाहीच्या निर्मितीस किंवा चीनसारख्या शत्रूच्या आक्रमणास अनुकूल भूमी तयार होते. अर्थात घेरावोसारखी कृत्ये आयोजणाऱ्यांचा त्यामागे हाच उद्देश असतो हे वेगळे सांगावयास नकोच.

## (६) घेरावो व आर्थिक क्षेत्र

घेरावोने केवळ राजकीय क्षेत्रात उत्पात घडतात असे नव्हे. घेरावोमुळे आर्थिक क्षेत्रात अनेक अनिष्ट परिणाम घडतात. कामगारांच्या कोणत्याही प्रश्नात प्रथम जर काही धोक्यात येत असेल तर ते कारखान्याचे उत्पादन होय. घेरावोच्या कृतीमध्ये तासन् तास अगर दिवसन् दिवस कामगार अधिकाऱ्यांभोवती घेरा घालून बसत असल्यामुळे, तेवढा काळ कारखान्याचे उत्पादन बंद पडून राहते हे उघडच आहे. पश्चिम बंगालमधील हल्लीचे संयुक्त मंत्रिमंडळ मार्च १९६७ च्या दुसऱ्या आठवड्यात अधिकारावर आले. या मंत्रिमंडळातील मजूरमंत्री श्री. सुबोध बॅनर्जी यांनी स्वतः जाहीर केल्याप्रमाणे हा मार्च महिना ते मे या कालावधीत एकूण ३१३ घेरावो झाले. तर पूर्वीच्या राजवटीत एकही घेरावो झाला नव्हता. मंत्रिमंडळाच्या पाठिंब्यामुळे ही समाजविघातक कृत्ये घडली हे जसे यावरून दिसून येते, तसेच या ३१३ प्रसंगी घेरावो जितका वेळ चालला, तितक्या प्रमाणात पूर्वीपेक्षा या कालखंडात उत्पादन घटले हेही यावरून निदर्शनास येते. उत्पादन घटण्याने केवळ संबंधित कारखान्याचे नुकसान होते असे नसून, एकूण देशाची आर्थिक पीछेहाट घडते व पर्यायाने कामगारांनी मिळविलेल्या सवलती नष्ट होण्याची परिस्थिती त्यातून उद्भवते. हे कामगारांच्या लक्षात येत नाही. शिवाय घेरावो, बंद, आदींच्या संदर्भात यंत्राची व इतर मालमत्तेची जी मोडतोड व नासधूस केली जाते, तिचीही या राष्ट्रीय नुकसानीमध्ये भर पडते हे वेगळेच. औद्योगिक अशांततेमध्ये पश्चिम बंगालचा अगदी पहिला क्रमांक लागतो. औद्योगिक कलहामुळे भारतामध्ये एकूण वाया गेलेल्या कामाच्या दिवसांपैकी एकट्या पश्चिम बंगालमध्ये ४३.५ टक्के इतके कामाचे दिवस वाया









गेले आहेत. व्यक्तिगतरीत्या विचार केल्यास कारखाना बंद राहाण्याने इतर कोणाचेही नुकसान न होता, फक्त कामगारांचेच नुकसान होत असते. संबंधी कामगार-पुढाऱ्यांना राष्ट्राची व कामगारांची ही नुकसानी बुद्ध्या घडवावयाची असली किंवा राजकीय हेतूसाठी या नुकसानीची पर्वा करायची नसली, तरी स्वतः कामगारांनी स्वहिताच्या दृष्टीने याबाबतीत जागृत होणे व दिशाभूल होऊ न देणे अत्यंत निकडीचे झाले आहे. तसेच घेरावोचे व औद्योगिक कलहांचे हे प्रकार पश्चिम बंगालमध्ये मोठ्या प्रमाणात चालतात म्हणून इतर प्रदेशांनी त्याबाबतीत निश्चिंत बसून चालणार नाही. कमी अधिक प्रमाणात हे प्रकार इतर राज्यातही येऊ घातले आहेत. तेव्हा इतर राज्यांच्या चालकांनी व नागरिकांनी चांगले जागरुक होऊन आपआपल्या ठिकाणी चांगला बंदोबस्त केला पाहिजे. किंबहुना सीमेवरील राज्य म्हणून पश्चिम बंगालमध्ये हे प्रकार जे मोठ्या प्रमाणावर घडवले जात आहेत, ते संबंध राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीने, पश्चिम बंगालमध्येही इत् उप्पर घडू देता कामा नये, यासाठी इतर राज्यांतील पुढाऱ्यांनी व नागरिकांनी सर्वतोपरी सहायभूत झाले पाहिजे.

## (७) घेरावो व कामगार चळवळ

घेरावोचा आता कामगार चळवळीच्या दृष्टीने विचार करू. कन्सिलिएशन ॲडज्युडिकेशन, संप, आदी कामगारांच्या मागण्या मान्य करून घेण्याचे कायदेशीर व सनदशीर उपाय आहेत. जरूर ती कायदेशीर नोटीस देऊन सर्वांनी कामावरून गैरहजर राहणे याचे नाव संप. कामगाराची नेमणूक करणे, व कामावर कामगाराने जाणे या मालक व कामगार यांच्यामधील नोकरीविषयक कराराच्या दोन बाजू आहेत. त्यामुळे संपाचा म्हणजे कायदेशीर नोटीस देऊन कामावरून गैरहजर राहण्याचा व त्यायोगे काम बंद पाडून मागणी मान्य करून घेण्याचा कामगारास कायदेशीर हक्क प्राप्त झाला आहे. अर्थातच, सबंध कारखान्यास अगर चालकवर्गास मन मानेल तेव्हा वेढा घालून बसणे, त्यांचा शारीरिक व मानसिक छळ करणे अगर त्यांचेवर अन्य अत्याचार करणे अगर मालमत्तेची नासधूस करणे, या घेरावोतील बाबी संपाच्या हक्कामध्ये संभवत नाहीत. अर्थातच घेरावोचे हे तंत्र स्वीकारण्याने मागण्या मान्य करून घेण्यासाठी कायद्याने प्राप्त झालेल्या **सनदशीर उपायांना पद्धतशीर व वाढता हरताळ फासला जात आहे.** दुसरे असे की, ज्या मागण्या संप न करता कन्सिलिएशनने अगर ॲडज्युडिकेशनने मान्य करून घेता येण्याजोग्या असतात, त्या मागण्यांबाबत संप करण्याने तसेच घेरावोनेही निष्कारण काम बंद पडून, **पर्यायाने उत्पादन घटते व खुद्द कामगारांच्या कामाचे म्हणजे वेतनाचे दिवस कमी होतात.** तिसरे म्हणजे संप आदी वैध उपायांना कामगारांची बहुसंख्या अवश्य असते, परंतु घेरावोसाठी कामगारांची कमी संख्या असली तरी चालते. त्यामुळे बहुसंख्य कामगार ज्या संघटनेत आहेत त्या संघटनेस कायदेशीर मार्गाने जावयाचे असले तरी **अल्पसंख्य कामगारांचा पाठिंबा असलेली कामगार संघटना घेरावोचा बेकायदेशीर मार्ग पत्करून मागण्या मान्य करून घेऊ शकते.** साहजिकच कायदेशीर मार्गाने जाणाऱ्या संघटनेतील सभासद फुटतात, कामगार चळवळीत राजकीय कारणांसाठी फूट पडते व फूट वाढत जाते. आणि **बेकायदेशीर मार्गाने जाण्यास कामगारांना धडा व प्रोत्साहन दिले जाते.** चौथे असे की, अल्पसंख्यांचा पाठिंबा असलेली व घेरावो सारख्या बेकायदेशीर मार्गाने जाणारी अत्याचारी कामगारसंघटना प्रतिपक्षीय कामगार संघटनांना कायमचे नेस्तनाबूद करण्यासाठी, या घेरावो आदींच्या दंगलीत **प्रतिस्पर्धी संघटनांच्या कार्यकर्त्यांवर** अत्याचार करतात व त्यांना ठारही करतात. पश्चिम बंगालात, डाव्या कम्युनिस्टांनी या दंगलीमध्ये कॉंग्रेस, संयुक्त समाजवादी, प्रजा समाजवादी आदी अनेक अन्य पक्षीय कामगार कार्यकर्त्यांना ठार केलेले आहे. अशा रीतीने घेरावोमुळे दंगल व अराजक निर्माण करणाऱ्या व खुद्द कामगारांचे आर्थिक नुकसान करणाऱ्या अनिष्ट मार्गाने कामगार चळवळ जात आहे. त्यामुळे समाजविघातक गुंडांना व गुंडशाहीलाही प्रोत्साहन मिळत आहे.

कामगार चळवळीच्या या अनिष्ट वळणाबद्दल दोन गोष्टी लक्षात घेणे जरूर आहे. कामगार-कायदे पक्षपाती आहेत, असे पश्चिम बंगालचे मजूरमंत्री











सुबोध बॅनर्जी यांचे म्हणणे आहे. त्यांची तक्रार खरी आहे असे जरी मानले तरी **त्याचा उपाय ते कायदे लोकशाही पद्धतीने बदलून घेणे हाच आहे.** याबाबतीत लक्षात घ्यावयाची दुसरी गोष्ट अशी की, कन्सिलिएशन, अॅडज्युडिकेशन, संप आदी कामगार चळवळीस प्राप्त झालेले कायदेशीर हक्क फक्त लोकशाही राष्ट्रातच कामगारांना असतात, कम्युनिस्ट अगर अन्य हुकूमशाही राष्ट्रात नसतात. म्हणजे **लोकशाहीने दिलेल्या या हक्कांचे आधाराने**, आणि लोकशाहीचे व कामगार हिताचे नाव घेऊन **भारतात आज लोकशाही विरोधी गट घेरावोसारखी लोकशाहीविरोधी व हिंसक कृत्ये करीत आहेत व त्यायोगे लोकशाहीचा शेवट घडवण्याचा ते प्रयत्न करीत आहेत.** तथापी कामगार व लोकशाहीवादी कामगार पुढारी हे लक्षात घेत नाहीत की, या कृत्यांनी लोकशाहीचा शेवट घडल्यास कामगारांचे हे प्राणप्रीय हक्कही कायमचे नष्ट होणार आहेत. थोड्याच दिवसांपूर्वी उपराष्ट्रपति श्री. व्ही. व्ही. गिरी यांनी हैद्राबाद येथे केलेले भाषण लक्षात घेणे इष्ट होईल. ते म्हणाले, " घेराओ हा मजुरांचा एक नंबरचा शत्रू आहे. जवळजवळ गेले अर्धशतक कामगार चळवळीतला मी नेता आहे. घेरावो असेच चालतील तर देशातील उद्योगधंदे धुळीस मिळतील आणि ट्रेड युनियन चळवळीने आत्महत्या केल्यासारखे होईल. "

## (८) घेरावो आणि शिक्षण आदी इतर क्षेत्रे

घेरावोचा पुरस्कार करणाऱ्यांनी घेरावोचे हत्यार केवळ कामगार क्षेत्रात वापरले आहे असे नाही. औद्योगिक क्षेत्राच्या खालोखाल हे अत्यार मुख्यतः शिक्षणक्षेत्रात वापरले जाते. एखादी प्रश्नपत्रिका अवघड काढली म्हणून, अभ्यासक्रमात इंग्रजी नको आहे म्हणून, म्हणजे अज्ञानी राहण्याचे स्वातंत्र्य मिळावे म्हणून, परीक्षा पुढे ढकलाव्या म्हणून, एखाद्या विद्यार्थ्यास त्याच्या गैरकृत्याबद्दल शासन केले म्हणून अशी कोणतीही मोठी व लहान कारणे कॉलेजमधील व हायस्कूलमधील विद्यार्थ्यांना घेरावो व बंद यांचा अवलंब करून हिंसक दंगली करण्यास पुरी पडतात. कलकत्ता नगरपालिकेच्या मेयर व इतर अधिकाऱ्यांच्या भोवती महानगरपालिकेच्या सेवकांनी दुर्गापूजेनिमित्त पगाराची आगाऊ उचल मिळावी म्हणून घेरावो घातला तर कलकत्त्याजवळील बेहला नगरपालिकेच्या संयुक्त समाजवादी चेअरमनला घेरावोवाल्यांनी चेअरमनपदाचा राजीनामा द्यावयास लावले. घेरावो व बंद करण्यास व त्याद्वारे हिंसक कृत्ये करण्यास कोणत्याही किरकोळ गोष्टी कारणीभूत होतात. याचे एक मनोरंजक उदाहरण म्हणजे दि. २२ एप्रिल, १९६७ रोजी एक लोकल ट्रेन फक्त १० मिनिटांनी उशीरा आली म्हणून कलकत्ता येथील सिआल्डा रेल्वे-स्टेशनवर रेल्वे गाडीची व इतर मालमत्तेची जमावाने मोडतोड व नुकसानी केली.

## (९) घेरावो व बंद –

अशा रीतीने घेरावो व बंद यांनी समाज-जीवनातील प्रमुख क्षेत्रे व्यापलेली आहेत. बंद हे घेरावोचे मोठे भावंड आहे. घेरावो मध्ये फक्त एका ठिकाणी घेरा घालून काम बंद पाडलेले असते, व व्यक्तींना रोखलेले असते. बंद मध्ये सबंध शहराचे सर्व उद्योग, व्यवहार व आवक-जावक बंद पडलेली असते. शहर एक प्रकारे संपूर्णपणे बंदवाल्यांच्याच ताब्यात असते. बंदवाल्यांना पोलिसांनी पकडण्याऐवजी अनेक वेळा पोलिसांचा पिच्छा बंदवाले करीत असतात. अशा रीतीने त्या दिवशी शहरातील नागरिकांची सुरक्षितता जवळजवळ नष्ट झालेली असते, लक्षावधी रुपयांचे त्या दिवसाचे उत्पादन घटते. कामगारवर्ग त्या दिवसाच्या रोजगारास मुकतो व मालमत्तेची मोडतोड, नासधूस व लुटालूट होते. सर्व नागरिक या कारवाया अगतिकतेने, असहायतेने व निमूटपणे सहन करीत असतात. कोणीही या कारवायांचा संघटित प्रतिरोध आयोजित नाहीत. आणि या बंदमध्ये किती कमीत कमी दंगली झाल्या यावर सरकार समाधान व धन्यता मानते. बंदवाल्यांचा किती मुकाबला केला यावर नाही. कारखानदारी उद्योगांवर प्राणांतिक धाक घालण्यात येत असता वृत्तपत्रांकडून ब्र काढला जात नाही अशी बंगालमधील कारखानदारांची तक्रार आहे. तर मदतीची मागणी केली असता पोलिसांकडून याबाबतीत मदत मिळत नाही अशीही तक्रार आहे. यावरून वृत्तपत्रे व








पोलिस यांच्यामध्येही भीतीचे वातावरण पैदा झाले असावे व त्यांची कुचंबणेची परिस्थिती झाली असावी असे दिसते.

मालमत्तेची मोडतोड, नासधूस व लुटालूट करणे, गुंड प्रवृत्तींना स्वैरमुक्तता मिळणे, अशांतता माजून हिंसक कृत्यें घडणे, गोंधळ माजवणे, आणि कायदा व सुव्यवस्था म्हणजे पर्यायाने सार्वजनिक सुरक्षितता धोक्यात येणे हे घेरावोचे लहान प्रमाणावर व बंदचे मोठ्या प्रमाणावर परिणाम घडत असतात. साहजिकच यास पायबंद घालण्याचे सर्वपक्षीय व अपक्षीय नागरिकांनी व संस्थांनी सर्व ठिकाणी संघटित प्रयत्न केले पाहिजेत. हे काम सरकारचे आहे असे म्हणून व हे सरकारच्या विरुद्ध निदर्शन आहे असे म्हणून बघ्याची भूमिका घेणे योग्य होणार नाही. सरकारलाही याबाबत कडक बंदोबस्त करावयास लावले पाहिजे व या बाबतीत सरकारच्या मागे नागरिक आहेत हेही दाखवून दिले पाहिजे. अनुषंगाने येथे हे नमूद करणे अवश्य आहे की, जे कामगार आदींना घेरावो आदींसाठी उद्युक्त करीत आहेत ते विस्तवाशी खेळत आहेत. घेरावो वगैरे हे दुधारी शस्त्र असल्यामुळे ते त्यांच्यावरच उलटून लागल्याखेरीज राहणार नाही.

## (१०) राज्य सरकारचे केन्द्र सरकाराविरुद्ध घेरावो व बंद

सर्वसाधारणपणे कारखान्यांविरुद्ध कामगारांनी, शिक्षण संस्थेविरुद्ध विद्यार्थ्यांनी व सरकारविरुद्ध नागरिकांनी घेरावो किंवा बंद अवलंबिल्याचे आपण पाहतो तथापि आतां राज्य सरकारांनी केन्द्र सरकार विरुद्ध घेरावो व बंद केल्याचे पाहण्यास मिळाले आहे. नुकतेच काही दिवसांपूर्वी राज्यास पुरेसे अन्नधान्य पुरवले नाही म्हणून पश्चिम बंगालच्या व केरळच्या राज्यकर्त्यांनी केन्द्र सरकारविरुद्ध राज्य पातळीवर बंद घडवून आणला. केन्द्र सरकारच्या कचेऱ्यांवर घेरावो घातले, आणि खुद्द पंतप्रधानांच्या निवासस्थानाभोवती घेरावो व उपोषण करण्यास बंगालचे मंत्री गेले.

पंतप्रधानांनी थोडी बोलणी करून तडजोड घडवून आणली. म्हणून पंतप्रधानांच्या निवासस्थानावरील कार्यक्रम मागे घेतला गेला इतकेच. घटक राज्यांच्या राज्यकर्त्यांनी आयोजलेल्या केन्द्राविरुद्धच्या या घेरावो व बंदच्या कार्यक्रमावरून एक मुख्य गोष्ट व्यक्त होते. ती ही की, ज्यांनी सरकार म्हणून कायदा व सुव्यवस्था यांची अंमलबजावणी करायची त्यांनी स्वतःच कायदा तोडायचे काम करायचे. जगात अन्यत्र कोठेही असे घडले असेल असे वाटत नाही. कायद्याची अंमलबजावणी करणाराच कायदा मोडू लागला, तर समाजाला स्वास्थ्य व सुरक्षितता मिळणारच कोठून आणि जनतेने त्यासाठी पाहायचे कोणाकडे, आणि ज्या राज्य घटनेचा व लोकशाहीच्या आधारामुळे अशी कृत्ये केली जातात व होऊ शकतात, तिचे काय ? अर्थात् यातून गोंधळ ,अंधार, व सर्वनाशच पदरी पडू शकेल. तथापि या बंदच्या कार्यक्रमामध्ये एक थोडा आशेचा किरण पाहावयास मिळाला आहे. राज्य सरकारचा पाठिंबा असून देखील केरळमधील बंदचा कार्यक्रम बराचसा अयशस्वी झाला. तेथील लोकशाहीवादी नागरिकांना व संस्थांना हे भूषणावहच आहे. लोकांनी जरा निर्धार केला तर, या बेकायदा व गैरकृत्यांना राज्य सरकारांचा पाठिंबा असूनसुद्धा त्यांचा यशस्वी मुकाबला करता येतो हे केरळच्या या उदाहरणावरुन दिसून आले आहे. लोकशाहीवाद्यांना व समाजाचे स्वास्थ्य राखू इच्छिणाऱ्यांना हे मार्गदर्शक व उत्साहवर्धक आहे.

## (११) हायकोर्टाच्या निर्णयाची फलश्रुती

लोकशाहीविरोधी, अत्याचारी व अनैतिक अशा घेरावोच्या कारवाईस कलकत्ता हायकोर्टाने बेसनदशीर व बेकायदा ठरवले याबद्दल हायकोर्टास केव्हाही धन्यवादच दिले पाहिजेत. या निर्णयामुळे कायद्याच्या राज्याची प्रतिष्ठापना होईल व लोकशाहीस संरक्षण लाभेल अशी आशा लोकांनी बाळगणे योग्यच होईल. तथापि ही आशा कितपत फलद्रुप होईल हा प्रश्न उद्भवतो. कारण दि. २९ सप्टेंबर १९६७ रोजी म्हणजे कलकत्ता हायकोर्टामध्ये घेरावोविरुद्ध निकाल ज्या दिवशी लागला, त्याच दिवशी जय अिंजिनियरिंग वर्क्सच्या एक हजार कामगारांनी कंपनीची सर्वसाधारण वार्षिक सभा चालली होती, त्या हॉटेलवर निशाणे, व फलक घेऊन



अनुक्रमणिका







घोषणा करीत सकाळपासून वेढा घातला. सभेचे काम संपल्यावर भागीदार व संचालक मंडळींना बाहेर जाऊ दिले, परंतु मॅनेजिंग डायरेक्टरांना रात्री साडेदहापर्यंत अडकवून धरले. शेजारी पोलिसांची एक मोठी तुकडी होती, तरी पण मध्ये न पडता, पोलिस नुसते पाहात राहिले. कोर्टापुढे अद्याप मजूर संघटना आल्या नसल्यामुळे व घेरावोची मुळे कामगार चळवळीत खोल गेली असल्यामुळे कारभारयंत्रणेकडून कडक उपाय योजल्याखेरीज घेरावोस पायबंद बसेल असे वाटत नाही. बंगाल सरकारची परिपत्रके हायकोर्टाने बेकायदा ठरवली असली तरी व घेरावोसही बेकायदा ठरवले असले तरी बंगाल व केरळमधील राज्यकर्त्यांची सरकारीरीत्या घेरावोला सहानुभूती असल्यामुळे, याबाबतीत प्रत्यक्षातील अंमलबजावणी या निर्णयानुसार घडेलच किंवा काय यावद्दल शंका वाटते. शिवाय, अंमलबजावणी करणारे पोलिस-खातेही या निर्णयाची अपेक्षित कार्यवाही करण्यास कितपत धजेल हाही प्रश्न यातून निर्माण होतो.

म्हणून या बाबतीत नागरिकांनी, वृत्तपत्रांनी व विविध संस्थांनी जास्तीत जास्त जागरूक राहून जरूर ती अंमलबजावणी करून घेतली पाहिजे हाच यातून निष्कर्ष निघतो.

### (१२) घेरावो व बंद याबाबत उपाय-योजना

वरील सर्व हकीकत व विवेचन लक्षात घेता, घेरावो, बंद वा अन्य तत्सम हिंसक व दंगलीच्या कृत्यांबाबत खालीलप्रमाणे उपाययोजना योग्य ठरेल असे वाटते.

(अ) कायदेभंगाच्या कोणत्याही कृतीविरुद्ध योग्य तो कायदेशीर इलाज सरकारने न डगमगता व विना-पक्षपात केला पाहिजे. (आ) या इलाज-योजनेस कोणत्याही पक्षाने अगर गटाने विशेषतः लोकशाहीवादी पक्षाने अगर गटाने विरोध दर्शवू अगर करू नये. (इ) नागरिकांमध्येही असाच दृष्टिकोन असावा व नागरिकांमध्ये असा दृष्टिकोन-निर्माण करण्याचे प्रयत्न केले जावेत. (ई) सरकारचे अगर अन्य कोणाचे कोणतेही कृत्य नापसंत किंवा अन्याय-कारक वाटल्यास, त्यावर संबंधितांनी सनद-शीर इलाज करावा, परंतु कोणतेही बेसनदशीर किंवा बेकायदा कृत्य करू नये अगर कायदा हातात घेऊ नये. (उ) कोणत्याही गाऱ्हाण्याचे अगर अन्यायाचे सरकारने शक्य तितक्या त्वरेने व विना-पक्षपात निराकरण करीत जावे, म्हणजे कायदा तोडण्याचा सहसा प्रसंगच उद्भवू शकणार नाही. (ऊ) कामगार कायद्यांमध्ये अगर अन्य कोणत्या कायद्यामध्ये दोष असल्यास की, ज्या दोषांमुळे कामगारांच्या अगर अन्य कोणाच्या घेरावो आदी कृत्यास कारण घडते, त्या कायद्याची जरूर ती तपासणी करून योग्य ती दुरुस्ती करण्याची संबंधित सरकारांनी तजवीज करावी. तसेच त्या कायद्यामध्ये सरकारकडून योग्य ती दुरुस्ती करवून घेण्याचे संबंधितांनीही सनदशीर प्रयत्न करावेत. (ए) अशा सर्व प्रयत्नांनी कायद्याची प्रतिष्ठा व अधिराज्य चांगल्या रीतीने प्रस्थापित करावे, आणि कायद्याच्या अधिराज्याची बैठक जी लोकशाही ती जनमानसात अधिकाधिक प्रिय व दृढ करावी.

घेरावो आदी बेकायदा व हिंसक कृत्यांच्या गैर अनुभवांवरून हा धडा घेतला जाईल अशी आशा करू या.












डॉ. ग. ना. जोशी

# तत्त्वचिंतक जवाहरलाल नेहरू : १ :

पंडित जवाहरलाल नेहरू ह्यांचे या जगातून निर्गमन होऊन तीन वर्षे झाली. त्यांचा भारतीय मनावरील प्रभाव व पकड ही अजूनही ताजी वाटते. जवाहरलालांचे व्यक्तिमत्व हे अत्यंत चैतन्यमय, उत्साही, कार्यशील व तेजस्वी असे होते. त्यांचे राजकीय जीवन प्रदीर्घ, रोमांचकारी व प्रगतिकारक होते. स्वातंत्र्यपूर्व व त्यानंतरच्या काळात भारतीय तरुणांच्या हृदयसिंहासनावर विराजमान होण्याचा मान महात्मा गांधी व लोकमान्य टिळक यांच्यानंतर पंडित जवाहरलाल नेहरू व नेताजी सुभाषचंद्र बोस ह्यांनाच मिळालेला होता. लोकप्रियतेत जवाहरलालांइतके वरचे स्थान क्वचितच कोणाला मिळाले होते. जवाहरलाल हे तरुणांच्या हृदयात भावनांची भरती आणणारे जणु चंद्र होते. आपली वाणी व कृती ह्यांनी आबालवृद्धांची अंतःकरणे भरारून सोडण्याचे व उचंबळवून त्यांच्यात चैतन्य ओतण्याचे असामान्य सामर्थ्य जवाहरलालांच्या जवळ होते. त्यांच्याइतका प्रभावी, लोकप्रिय आणि चैतन्यशाली नेता विरळा.

पंडित नेहरूंचे व्यक्तिमत्व केवळ एक राजकारणी पुरुष एवढेच मर्यादित नव्हते. आधुनिक भारताच्या मुक्तिसंग्रामाचे ते एक आघाडीचे धैर्यवान् व धाडशी नेते होते. भारतातील ब्रिटिश साम्राज्यशाहीला जाहीर आव्हान देऊन त्या सत्तेचा अंत करून भारतास स्वतंत्र करण्याच्या कामाला त्यांनी निष्ठेने वाहून घेतले होते. अत्यंत श्रीमंत घराण्यात जन्माला येऊन व वाढून, इंग्लंडमध्ये शिक्षण घेऊन व बॅरिस्टरची पदवी संपादन करून झाल्यावर जर त्यांनी पैसा व सत्ता मिळविण्याचे व ऐषआरामात जगण्याचे ठरविले असते तर अमाप पैसा, लक्ष्मी व सत्ता ह्यांनी त्यांच्या पायाशी लोळण घेतली असती, अशी त्यांची त्यावेळची परिस्थिती होती. परंतु त्यांचा पिंड वेगळा होता. केवळ सुखोपभोग घेण्यात व ऐषआरामात लोळण्यात त्यांना धन्यता वाटली नाही. ऐन तिशीतला तेजस्वी, बुद्धिमान् व तडफदार असा हा तरुण भारतमातेच्या स्वातंत्र्याच्या प्राप्तीसाठी हाती सतीचे वाण घेऊन घराबाहेर पडला. अलाहाबादच्या सुंदर व ऐश्वर्यसंपन्न अशा आपल्या आनंद-वनभवनातील आपले वास्तव्य त्याने संपविले, व भारताच्या विशाल प्रांगणात तो वाऱ्यासारखा सर्वत्र हिंडू लागला. प्रिय, सुस्वरूप, नाजूक व हळव्या प्रकृतीच्या आपल्या जीवनसहचरीकडे त्याने दुर्लक्ष केले व दरिद्री भारताच्या संसाराशी एकरूप झाला. प्रेमळ मातापितरांच्या एकुलत्या एक पुत्राविषयींच्या नाजूक भावनांची फारशी कदर न करता भारतमातेच्या खडतर सेवेची त्याने प्रतिज्ञा घेतली. भारताचे स्वातंत्र्य मिळविण्यासाठी सर्व तऱ्हेच्या हालअपेष्टा सहन करण्याची त्याने दीक्षा घेतली आणि ब्रिटिशांच्या साम्राज्याविरुद्ध भारतीय जनतेस जागृत व संघटित करण्याचे महान व दुर्घट कार्य त्याने हाती घेतले. कॅाँग्रेससारख्या राष्ट्रव्यापी राष्ट्रीयसंस्थेचे त्याने नेतृत्व केले. तत्कालीन ज्येष्ठ नेते व कार्यकर्ते यांच्याजवळ त्याने राजकीय नेतृत्वाचे धडे घेतले आणि त्याने जबरदस्त अशा ब्रिटिश साम्राज्यशाहीस आह्वान ठोकले. भारतास परकीय सत्तेपासून व युगायुगांचे दारिद्र्य, अज्ञान, दुःख, असहायता व दौर्बल्य यापासून मुक्त करण्यास तो बद्धपरिकर झाला. पंडित नेहरू हे बुद्धिमान्, योजक, मुत्सद्दी व धडाडीचे राजकीय नेते होते हे त्यांनी स्वातंत्र्यसंग्रामात जसे दाखवून दिले तसेच स्वातंत्र्य मिळाल्यानंतरही सुमारे सतरा वर्षे भारताचे पंतप्रधान म्हणून कार्य करून आर्थिक व राजकीय दृष्ट्या अविकसित अशा भारताची स्वातंत्र्योत्तर काळात पुनर्रचना करण्याचे व सर्व प्रकारे त्याला आधुनिक स्वरूप देऊन ऊर्जितावस्थेस आणण्याचे अत्यंत मोलाचे कार्य त्यांनी करून आपल्या अंगी वसणारी विधायक प्रवृत्ती सिद्ध करून दाखविली.

नेहरूंनी भारताच्या पंचवार्षिक योजना आखून त्या कार्यवाहीत आणल्या. भारताच्या सर्वांगीण विकासासाठी मुख्यतः आर्थिक, वैज्ञानिक, औद्योगिक, तांत्रिक व कृषि-

विषयक क्षेत्रात त्यांनी प्रचंड योजना आखल्या. पोलाद, सिमेंट, खते, विजेची व इतर उपकरणे, आगगाड्यांची एंजिने व डबे, विमानांची एंजिने व सुटे भाग, घड्याळे, रेडिओ व इतर यंत्रसामग्री बनविण्याचे अनेक कारखाने भारतात त्यांनी अल्पकालात सुरू करून औद्योगिक बाबतीत देशास स्वावलंबी बनविण्याचे प्रयत्न केले. सर्वत्र साक्षरता सुरू केली. प्राथमिक, दुय्यम व विद्यापीठीय शिक्षणात आमूलाग्र परिवर्तन घडवून आणण्यासाठी कमिशने नेमून नवीन योजना तयार करविल्या. मोठ्या प्रमाणात शाळा, कॉलेजे व विद्यापीठे सुरू करविली. यंत्र व तंत्रशास्त्रज्ञ परदेशात पाठवून त्यांना शिक्षण देववून आणले. भाक्रा, हिराकुड, कोयना, नागार्जुनसागर यासारखी प्रचंड धरणे बांधवली. शेतीस पाणीपुरवठा करून व खते पुरवून शेतमालाचे व धान्याचे उत्पन्न वाढविण्याचे प्रचंड प्रयत्न केले. सांस्कृतिक क्षेत्रात नवीन सुधारणा केल्या. साहित्य व ललितकला अकादमी काढल्या. संगीत, नृत्य व नाट्य इत्यादी कलांच्या विकासासाठी साहाय्य देऊन त्यांना राज्यातर्फे प्रोत्साहन दिले. परदेशाशी भारताचे संबंध प्रस्थापित केले. सर्व देशात भारतीय वकिलाती स्थापिल्या. जगातील सर्व राष्ट्रांशी मैत्रीचे व सलोख्याचे संबंध ठेवून व्यापारी, आर्थिक व सांस्कृतिक देवाणघेवाण मोठ्या प्रमाणात चालू केली. अनेक परदेशी नेते व पाहुणे यांना भारतात येण्यासाठी निमंत्रणे करून भारताचा जगात सर्वदूर परिचय घडवून दिला. राजकीय क्षेत्रात परतंत्र व अविकसित राष्ट्रांचे संघटन करून त्यांना एकत्र आणून जगातील विविध राष्ट्रांना त्यांच्या विकासासाठी व साम्राज्यशाहीविरोधी अनेक चळवळींना प्रोत्साहन दिले. अविकसित व अर्धविकसित राष्ट्रांच्या आर्थिक प्रगतीसाठी आंतरराष्ट्रीय संघटना उभारल्या. आर्थिक व औद्योगिकदृष्ट्या मागासलेल्या देशांना आपला आर्थिक व सांस्कृतिक विकास करण्यास योग्य ती शांतता व सुस्थिरता लाभावी म्हणून जगात युद्धविरोधी आघाड्या उभारल्या. संहारक अण्वस्त्रांच्या निर्मितीच्या व वापराच्या विरुद्ध युनोच्या मार्फत जागतिक जनमत जागृत व संघटित केले. अहिंसा, परस्पर सहिष्णुता व परस्परांच्या स्वातंत्र्याविषयी आदर बाळगून परस्परांशी अनाक्रमणाचे तह करून सातत्याने शांतता टिकविण्यासाठी व शांततामय सहजीवन जगण्यासाठी आणि योजनाबद्ध रीतीने आर्थिक व औद्योगिक विकास घडवून आणण्यासाठी राष्ट्रांच्या फळ्या उभारल्या. 'पंचशीलाचे' नवे नीतिधिष्ठित राजकीय तत्त्व पुरस्कारले व त्याला जगातील प्रमुख राष्ट्रांची संमती मिळविली. अशा रीतीने भारताचा मान व प्रतिष्ठा वाढवून त्याला जगातील प्रमुख राष्ट्रांच्या मालिकेत नेऊन बसविण्यासाठी अल्पावधीतच त्यांनी भगीरथ प्रयत्न केले. अत्यंत तत्परतेने त्यांनी आदर्श अशी राष्ट्रीय घटना तयार करवून भारतास स्थिरता आणून व कठीण असा सार्वत्रिक लोकशाहीचा प्रयोग या विशाल व अज्ञानी देशात यशस्वीपणे सुरू करून जगातील सर्वात मोठे लोकशाही राष्ट्र असे गौरवाचे स्थान त्याला प्राप्त करवून दिले.

नेहरूंना सामान्य माणसाविषयी कमालीची आपुलकी व कळवळा वाटे. गरिबांची दुःखे, दारिद्र्य, अज्ञान, मानहानी व असहायता ही पाहून त्यांचे हृदय व्यथित होत असे. गरीबांच्या दुःखांचा, दारिद्र्याचा व अज्ञानाचा नाश झाला पाहिजे व तो सर्व प्रयत्नांनी लवकरात लवकर केला पाहिजे अशी त्यांची मूलभूत जीवनप्रेरणा होती, या त्यांच्या अंतःकरणाच्या तीव्र व्यथेतून त्यांनी साम्यवाद व समाजवाद यांचा अभ्यास केला. त्यांच्या तरुणपणी ते साम्यवादाच्या व समाजवादाच्या तत्त्वज्ञानाने प्रभावित व मोहित झाले. कॉंग्रेसमध्ये त्यांनी कॉंग्रेससमाजवादी तरुण कार्यकर्त्यांचा गट तयार केला व भारतातील दारिद्र्य, अज्ञान, बेकारी व मागासलेपणा यांचे निर्मूलन करण्यासाठी त्यांनी समाजवादी अर्थशास्त्राचा स्वीकार केला. कॉंग्रेसच्या संपूर्ण राजकीय विचारावर आपला प्रभाव पाडून कॉंग्रेसला समाजवादास अनुकूल बनविण्याचे महान् कार्य त्यांनी केले. भारतास समाजवादाची दीक्षा देण्याचे महनीय कार्य त्यांनीच केले. व तेच करू शकले. भारताचा जो आधुनिक तोंडावळा आहे, त्याचे जे विकसनशील व प्रगतीशील रूप आहे त्याचे खरे कारण व प्रेरणा जवाहरलालजीच होते. त्यासाठी त्यांना फार विरोधातून जावे लागले. थोरामोठ्यांना नाराज करून त्यांना त्यांच्याविरुद्ध उभे राहावे लागले व त्यांना विरोध करूनही ते समाजवादाच्या तत्त्वास एकनिष्ठपणे चिकटून राहिले.








भारतात अनेक धर्म, अनेक वंश, अनेक भाषा व संस्कृती यांची विविधता आहे. या सर्वांना जपून ठेवून त्यातून एकीभूत, संघटित, बलवान व एकात्म असा भारत उभा करण्याचे अवघड कार्य ते सतत करीत राहिले. सर्वांना सांभाळून घेऊन, सर्वांचे जास्तीत जास्त सहकार्य घेऊन भारतास भौतिक, नैतिक व आध्यामिक ऊर्जितावस्था आणून त्याला एक बलवान व समर्थ राष्ट्र म्हणून जगात पुढे आणावयाचे यासाठी त्यांनी आपल्या आयुष्याचा क्षणन् क्षण वेचला व रक्ताचा थेंबन् थेंब आटविला. इतके चिन्मय व सर्व-स्पर्शी व्यक्तिमत्व पूर्वी क्वचितच कोठे होऊन गेले असेल !

पंडित नेहरूंचे व्यक्तिमत्त्व बहुरंगी, निर्भय, कल्पक, सर्जनशील, साहसी, विधायक व प्रसन्न होते. त्यांच्या दर्शनाने लाखो लोकांची-तरुणांची, थोरामोठ्यांची, बालांची सर्वांची मने पुलकित होत, रोमांचित होत, स्फूर्तीने भारावून जात. आपल्या समर्थ, समृद्ध व चैतन्यशाली व्यक्तिमत्वाने त्यांनी उभ्या भारतात उत्साहाचे, भावनेचे, राष्ट्रनिष्ठेचे व त्यागभावनेचे जणु मोठे उधाणच आणले होते. ते तरुणांच्या हृदयांचे जणु अनभिषिक्त सम्राटच होते. आपण लोकांना फार आवडतो ह्याची त्यांना चांगली कल्पना होती. लोकांचे आपल्यावरील प्रेम ही एक मौल्यवान गोष्ट आहे, असे ते मानत व आपल्या प्रचंड लोकप्रियतेस ते मोठे धन समजत व त्याबद्दल स्वतःस धन्यही मानत. लोकप्रियतेच्या उत्तुंग शिखरावर असतानाच त्यांनी आपल्या आवडत्या कार्यात तल्लीन राहून आपल्या प्रिय अशा देशबांधवांचा व भारतभूमीचा शेवटचा निरोप घेतला. आपल्या देशबांधवांवर व भारतभूमीवर प्रेम करण्यात त्यांना कधी शीण आला नाही किंवा ते कधी कंटाळले नाहीत. या भारतभूमीचे अनंत आकाश, बर्फाच्या शुभ्र शिखरांनी चमकणारा धवलगिरी हिमालय, सदैव स्फटिकासारख्या जलधारांनी वाहणारी गंगामाई, श्रीकृष्णाच्या मुरलीच्या असामान्य माधुर्याने पुलकित व मुग्ध बनलेली श्यामला यमुनामाई, सागराप्रमाणे प्रचंड जलराशी घेऊन वाहणारी नदीसारखी ब्रह्मपुत्रा व पद्मा, भेडा घाटाच्या संगमरवरी खडकांच्या शुभ्रधवल कपाऱ्यातून उड्या घेणारी व पृथ्वीवर धवल-स्वप्न साकार करणारी नर्मदा, तपोवनात शांत व गंभीर स्वन करणारी व राजमहेंद्रीजवळ सागरासारखी विस्तृत पसरलेली दक्षिणगंगा गोदावरी, अमाप जलराशींनी धावणारी कावेरी, निळ्याहिरव्या प्रशांत रमणीयतेने नटलेले नीलगिरी, काळ्या खडकांनी भरलेले व दीर्घकाल उग्र तपस्या करणारे सह्याद्रीचे तापसी, अहर्निश प्रचंड लाटांच्या तांडवांनी मुखरित असलेली त्रिसागरवेष्टित कन्याकुमारीची भूशलाका, नारळांच्या, काजूंच्या व पोफळींच्या बागांनी सदैव हिरव्यागार असणाऱ्या बागांनी भारताचे नंदनवन करणारी गोव्याची व केरळची स्वप्नभूमी, क्षितिजापर्यंत लांबचलांब पसरलेले बारीक वाळूचे कच्छचे रण, कधी धवल व कृष्ण मेघांनी आच्छादलेले तर कधी निरभ्र रात्री प्रशांत तेजाने चमचमणाऱ्या नक्षत्रतारकांनी तरारलेले व पुलकित झालेले निळेभोर आकाश, अरुणोदयापासून तर रात्रीच्या काळोखापर्यंत आनंदाने बेहोष होऊन कधी जमिनीवर बागडणारे व कधी आकाशात स्वैरपणे भराऱ्या घेऊन तरंगणारे अनंत प्रकारचे रंगीबेरंगी पक्षी, उंचच उंच वाढलेले हिमालयाच्या कुशीत सदैव उभे राहून तपस्या करणारे पुरातन चिनार वृक्ष, गहन अशा दऱ्या व खोऱ्या, अशा विविध रमणीय रूपांनी नटलेल्या भारतभूमीवर जवाहरलालांनी जन्मभर निरतिशय प्रेम केले व अशा या त्यांच्या प्रिय मातृभूमीचा त्यांनी २७ मे १९६४ रोजी एके दिवशी सुप्रभाती शांतपणे निरोप घेतला. मरताना ना यातना ना वेदना. पाहता पाहता त्यांची शुद्ध हरपली व त्या अबोध अवस्थेतच ते जगन्मातेच्या कुशीत चिरनिद्रा घेण्यासाठी निघून गेले. जवाहरलाल भारतभूमीवर इतके प्रेम करीत होते की मृत्यूनंतर या भूमीच्या कणाकणाशी तदाकार व एकरूप होऊन राहण्यासाठी आपल्या रक्षेचे कणन् कण हे भारताच्या नद्या व शेताशेतातून सर्वत्र विखुरले जावेत व मरणान्ती आपण या देशाचे बांधव, या देशाची माती, या देशाची शेते, मळे, तलाव, नद्या, झाडे, रानें, डोंगर, पठारे, सागर व निर्झर यांच्यात रक्षाकणांनी मिसळून जाऊन व विलीन होऊन त्यांच्याशी चिरमीलन साधावे व त्यांच्याशी एकरूप व एकजीव होऊन राहावे, अशा इच्छेने प्रेरित होऊन त्यांनी आपल्या मृत्युपत्रात " माझी रक्षा विमानातून देशभर सर्वत्र शेताशेतावर विखरून टाकावी " अशी इच्छा व्यक्त करून ठेविली होती. जिवंत शरीर








लहानसे, त्याला असंख्य मर्यादा; त्यामुळे जिवंतपणी या देशाच्या मातीशी व भूमीशी तदाकार होता येत नाही ही दुःखद जाणीव जणु त्यांना होती; परंतु या देशाच्या विशाल भूमीशी प्रत्यक्षात निदान मरणोत्तर तरी एकरूप होऊन राहण्याची इच्छा पूर्ण करण्यासाठी त्यांनी या देशाची शेते व नद्या यावर आपल्या रक्षेचे कण विमानातून विखरुन टाकण्याची ही कल्पना मांडली ती जगाच्या इतिहासात अनन्यसाधारण व तितकीच काव्यमय आहे. नेहरूंचे कविमन व सौंदर्याने रसरसलेले अंतःकरण त्यांच्या या काव्यमय इच्छेतून अत्यंत यथार्थपणे व्यक्त झालेले आहे. आपल्या सबंध आयुष्यात नेहरूंनी जरी अविश्रांत श्रम केले व हाल सोसले तरी निसर्गाच्या सान्निध्यात ते नेहमीच आपल्या चिंता व मनस्ताप विसरुन जात. हिमालयाची उत्तुंग धवलशिखरे, शांत व निळेभोर आकाश, विविध रंगांनी नटणारे वृक्ष व वेली, आनंदाने नाचणारे, बागडणारे व किलबिल करून जीवनाचा आनंद उपभोगणारे पक्षी, कधी शांत तर कधी बेफाम होऊन वाहणाऱ्या तरंगिणी, काश्मीरमधील नयनरम्य सरोवरे, फुलांचे ताटवे, सौंदर्याने डंवरलेल्या बागा ह्यांनी त्यांचे मन मोहित होई व सौंदर्यपूर्ण वातावरणात ते सर्व मनस्ताप विसरुन ताजेतवाने बनत असत. जवाहरलालांनी सौंदर्याचा मनमुराद आस्वाद घेऊन जीवनाची धुंदी मनसोक्तपणे अनुभवलेली होती. ते आपले जीवन पूर्णतेने व भरल्या अंतःकरणाने जगले होते. जगण्याचा त्यांना कधी कंटाळा व वीट आला नाही. त्यांनी जीवनाचा तिरस्कार कधी केला नाही. जे जे व जसे जसे जीवन व अनुभव त्यांच्या वाट्यास आले, मग ते बरे असोत की वाईट असोत, सुखाचे असोत की दुःखाचे असोत, मीलनाचे असोत की विरहाचे असोत ते ते त्यांनी मोकळ्या मनाने अनुभवले. त्यांनी जीवनाचा त्यांच्या विविध रूपात व अवस्थात मुक्त मनाने अनुभव घेतला. त्यांचे जीवनावरील प्रेम कधी कमी झाले नाही. त्यांना तसे मृत्यूचेही कधी भय वाटले नाही. परंतु जीवनाविषयी विराग व तिटकारा वाटून त्यांनी मृत्यूची कधी आराधनाही केली नाही. तसे ते जीवनप्रेमी होते. जीवनावर त्यांचे उत्कट प्रेम होते पण त्याची आसक्ती त्यांनी धरली नाही. महान् ध्येयाच्या साक्षात्कारासाठी वेळ पडल्यास मृत्यूला आनंदाने कवटाळण्यासही त्यांनी कधी कसूर केली नाही. उलट मृत्यूच्या उंबरठ्यावर उभे राहूनच त्यांनी जीवनाचा खरा आनंद अनुभवला. जीवनाचा अर्थ समजावून घेतला व जीवनाची महती अनुभवली. नेहरूंची रसिकता– जीवनरसिकता ही अभिजात होती. त्यांनी जीवनाचे सर्वस्पर्शी स्वरूप स्वतःच्या अंतःकरणात पूर्णपणे अनुभवले होते. जीवन हे अनंत, विविधांगी, विविधरूपी व गुंतागुंतीचे व गूढ असल्याने त्याची अनंत गूढता अनुभवण्यात व बुद्धीला शक्य तेवढा त्याचा अर्थ लावण्यात त्यांना सदैव आनंद व समाधानाच वाटत होते. नेहरूंची सौंदर्यासक्ति, रसिकता व जीवनाभिमुखता ही शेवटपर्यंत जिवंत व ताजीतवानीच होती. निसर्गातील व जीवनातील सौंदर्य टिपण्याची सूक्ष्म व तरल संवेदनाशीलता त्यांच्या ठिकाणी वसत होती. त्यांचे जीवन चैतन्याने सळसळणारे, रसरसलेले व कालमानाप्रमाणे बदलणारे असे प्रवाही व जिवंत होते. गुरुदेव रवींद्रनाथ ठाकूर त्यांना कौतुकाने 'ऋतुराज' म्हणत असत, ते जवाहरलालांना शोभणारे असेच होते. जीवनाविषयींची त्यांची दृष्टी रसिकतेची, सौंदर्यप्रेमी, निरागस व निष्पाप बालकाच्या मनासारखी होती. त्यांची शारीरिक प्रकृति व मानसिक पिंड हे दमदार व निकोप होते. प्रकृतीने ते निरोगी होते. मनाने कणखर, निर्भय, खंबीर, आशावादी, बुद्धिप्रधान व कार्यप्रवण होते. बुद्धीने चिकित्सक, वैज्ञानिक प्रवृत्तीचे, वस्तुनिष्ठतेकडे झुकलेले होते. अंतःकरणाने प्रेमळ, उदार, अतिशय संवेदनाक्षम व सौंदर्यासक्त होते; वृत्तीने आध्यात्मिक व चिंतनशील होते. परलोकाची ओढ नसतानाही जीवनाच्या उच्च आध्यात्मिक व नैतिक मूल्यांचे मात्र त्यांना कमालीचे आकर्षण वाटत असे.

इतके सर्व असूनही ते भारतास व जगतास एक विख्यात राजकारणी पुरुष म्हणून सुपरिचित होते. ते राजकीय कार्यकर्ते व नेते होते; परंतु सत्ताभिलाषी नव्हते. नेहरूंचे राजकीय कार्य व राजकारण हे त्यांच्या देशबांधवावरील प्रेमातून जन्मास आले होते. आपल्या देशातील लोकांचे दारिद्र्य, अज्ञान, रोगराई व अनंत दुःखे ही पाहून त्यांचे नाजूक व हळवे मन व्यथित होई; त्यामुळे ते कमालीचे अस्वस्थ व दुःखी होत. आपल्या








देशबांधवांची आपण सर्व दुःखापासून सुटका केली पाहिजे, नव्हे तसे करणे आपले पवित्र नैतिक कर्तव्य आहे अशा उत्कट जाणिवेतून त्यांनी आपल्या राजकीय जीवनाची दीक्षा घेतली. लोकसेवा हीच नेहरूंच्या जीवितकार्याची मुख्य प्रेरणा होती. त्यांच्या ठिकाणी नेतृत्वास आवश्यक असे बरेच मौल्यवान गुण होते; म्हणून त्यांनी आपली मूळ प्रेरणा राजकारणात वापरून प्रभावी नेतृत्व केले. नेहरू हे आधुनिक भारताचे सर्व-श्रेष्ठ शिल्पकार होते, हे निःसंशय.

नेहरू हे जरी एक थोर राजकीय नेते होते तरी ते खालच्या दर्जाचे राजकारण खेळले नाहीत. त्यांच्या राजकारणास उदात्त अशी ध्येये, उद्दिष्टे व आदर्श होते. जीवनाचे उच्च आदर्श स्वतःच्या व देशाच्या जीवनात साकार करण्यासाठी त्यांनी राजकीय सत्तेचा व प्रतिष्ठेचा उपयोग करण्याचा सतत प्रयत्न केला. ते अत्यंत निः-स्वार्थी, सच्छील आचरणाचे व स्वच्छ चारित्र्याचे सत्पुरुष होते. त्यांचे जीवन शुद्ध, पवित्र, निर्मळ, त्यागी व निःस्पृह असे होते. देशबांधवांविषयी त्यांच्या मनात उत्कट प्रेम व कळकळ होती व ते प्रामुख्याने कर्मप्रवण वृत्तीचे, एक महान् कर्मयोगी होते. कार्य करणे हा त्यांच्या व्यक्तिमत्वाचा स्थायीभाव होता; अखंड कार्यरत राहणे हा त्यांचा जन्मजात पिंड व स्वभाव होता. कृतिप्रवणतेबरोबरच त्यांच्या ठिकाणी सखोल चिंतनशीलताही भरपूर होती. आपल्या कार्याबरोबर त्या कार्याचे संपूर्ण व यथार्थ स्वरूप आपणास व इतरास समजावे म्हणून ते स्वतः खोल विचार करीत व इतरां-नाही खोल विचार करावयास प्रवृत्त करीत. आपण जसे वागतो, जी कार्ये करतो तसे वागणे व ती कार्ये खरो-खरच बरोबर, निर्दोष व नैतिक दृष्ट्या अचूक आहेत की नाहीत ह्यावर ते नेहमींच चिंतन करीत. लाखो लोकांच्या समोर प्रचंड सभेत जाहीर भाषण करीत असतांना सुद्धा ते मध्येच अन्तर्मुख होत. आपण जे बोलतो, जे करतो, जसे वागतो ते सर्व आदर्शाच्या दृष्टीने कितपत बरोबर आहे, आपले कोठे चुकते आहे की काय, कोठे, काय व का चुकते आहे ह्याचा ते स्वतः विचार करीत व शोध घेत व स्वतःबरोबर इतरांनाही **सहचिंतन** करावयास लावत. त्यांचे लिखाण वाचत असताना त्यांच्याठिकाणी चिंतन करण्याची कशी सवय व शक्ती होती ते अनेकदा लक्षात येते. राजकारणाच्या दैनंदिन कार्याच्या धबडग्यातही हा महापुरुष मध्येच एकदम तुटक बनावयाचा; तटस्थतेने स्वतःशीच विचार करू लागावयाचा व त्याचे स्वतःचे वैयक्तिक चिंतन हे बोलून व लिहून व्यक्त करावयाचा व ते सर्वांसाठी सहचिंतन ठरावयाचे. पंडितजी हे तांत्रिक अर्थाने 'तत्त्वज्ञानी' किंवा 'तत्त्वचिंतक' नव्हते, हे खरे. परंतु त्यांचे व्यक्तिमत्व हे तत्त्वचिंतकाचेच होते ही गोष्ट ठायीठायी लक्षात येते. त्यांचे केवळ भारताच्याच नव्हे तर अखिल जगताच्या व मानवतेच्या व मानवसंस्कृ-तीच्या इतिहासाचे ज्ञान विस्तृत, व्यापक व सखोल होते. ते आपल्या स्वतःच्या किंवा समाजाच्या व देशाच्या कृती जागतिक व मानवसंस्कृतीच्या पार्श्व-भूमीवर पाहून त्यांचा अर्थ लावण्याचा व समजावून घेण्याचा प्रयत्न करीत. लाखो लोकांच्या गर्दीत व गोंधळातही नेहरूंची एकाकी चिंतकाची व तत्त्व-ज्ञान्याची शांतता व अलिप्तता कायम राहून त्यांचे मुक्त मनाने चिंतन होत राही.

पंडितजींनी आपल्या आयुष्याची अठरा वर्षे कारावासात घालविली. ह्या अठरा वर्षांच्या काळात तुरुंगात त्यांना भरपूर शांतता, एकांतवास व विचार करावयास अवकाश मिळाला. तुरुंगांच्या भिंतींच्या आड कित्येक दिवस अन्तर्मुख होऊन त्यांनी मूकपणे घालविले. ह्या काळातील चिंतनाचे दृश्य फल म्हणजे त्यांचे 'आत्मचरित्र', 'भारताचा शोध', 'जगाच्या इतिहासाची ओझरती दर्शने', 'इंदिरेस पत्रे' यासारखे मौल्यवान ग्रंथ होत.

नेहरू स्वतःचे निरीक्षण करून स्वतःविषयी लिहि-तात– "सर्वसाधारणपणे मी तात्त्विक व सत्ताशास्त्रीय समस्यांचा माझ्या डोक्याला त्रास करून घेत नाही. तात्त्विक समस्यांना उत्तर नसते. कारावासातील दीर्घ-कालीन शांततेत अशा समस्या नकळतपणे माझ्या मनात उद्भवतात, आणि माझ्या अत्यंत तीव्र अशा कार्यमग्नतेतही त्या माझ्या मनात घोळत राहतात. काही दुःखद प्रसंगी अशा समस्या मला काहीशी तटस्थता व सांत्वन प्राप्त करून देतात. परंतु बहुशः कृती व कार्याविषयींचे विचार ह्यांनीच माझे मन भरलेले असते. आणि ज्यावेळी मला काही कृती करता येत नाही त्यावेळी मी अशी कल्पना








करतो की मी कोणत्या तरी कृतीची तयारी करीत आहे. ...... कृतीची मला सदैव हाक येत राहिलेली आहे. विचारविरहित कृती नव्हे, पण विचारातून अखंडपणे स्रवणाऱ्या कृतीने मला सदैव आवाहन केलेले आहे. आणि ज्या काही क्वचित प्रसंगी कृती व विचार ह्यांच्यात संवाद नसतो तेव्हा विचार कृतीप्रद नेऊन त्यात स्वतःची पूर्ति मिळवीत असतो व कृती परत विचाराकडे व अधिक परिपूर्ण आकलनाकडे वळते." अहमदनगरच्या किल्ल्यात बंदिवासात असताना पुढे जाऊन नेहरू आपल्या 'भारताचा शोध' या ग्रंथात लिहितात– "पुष्कळ वर्षांपूर्वी असा एक काळ होता की ज्यावेळी मला भारून टाकणाऱ्या कृतीतच मी गुरफटून राहात असे, व बराच दीर्घकालपर्यंत मी भावनोद्दीपनाच्या अवस्थेत राहात असे. ... माझे ते तारुण्याचे दिवस मला आता फार लांब गेलेले दिसतात; ते काही फार वर्षे लोटल्यामुळे नव्हे, पण प्रामुख्याने अनुभवांचा व दुःखद विचारांचा प्रचंड सागर आता त्याच्यापासून मला दूर करीत असतो म्हणून. माझ्या ठिकाणची ती जुनी भावनातिरेकता आता खूपच कमी झालेली आहे. जवळ जवळ दुर्दम्य अशा माझ्या ज्या ऊर्मि असत त्या आता बऱ्याचशा थंडावल्या आहेत आणि माझ्या भावना व माझे विकार आता बरेचसे माझ्या ताब्यात आलेले आहेत. विचारांचे ओझे आता अडथळ्यासारखे वाटते. पूर्वी मनात जेथे एके काळी खात्री असे तेथे आता संशय डोकावीत असतो. कदाचित् हे वाढत्या वयामुळे होत असावे किंवा हा ह्या कालाचा स्वभावच असावा. ...... आणि अजूनही कृतीची हाक माझ्या अंतःकरणाला खोलवर आतून थरारून सोडते. विचारांशी काही काळ हुज्जत घातल्यानंतर मला पुनः धोक्यात व संकटात बिनदिक्कतपणे उडी घेणारी व मृत्यूला सामोरा जाऊन त्याचा उपहास करणारी "आनंदपूर्ण अशी रमणीय ऊर्मि" अजूनही अनुभवावीशी वाटते. मला मृत्यूचे तसे प्रेम वगैरे काही वाटत नाही, परंतु त्याचबरोबर मृत्यु मला भेडसावतो असेही मला वाटत नाही. जीवनापासून निवृत्त होण्यावर किंवा त्याचा अस्त करण्यावर माझा विश्वास नाही. मी जीवनावर नितांत प्रेम केलेले आहे, आणि अजूनही जीवन मला आकर्षित करीत आहे. मी माझ्या विशिष्ट पद्धतीने जीवन अनुभवत असतो, त्याचा आस्वाद घेत असतो. अर्थात मला वेढून टाकणारे असे बरेचसे अदृश्य असे अडथळे आता निर्माण झालेले आहेत. परंतु जीवन जगण्याची माझी तीच वासना मला जीवनाशी क्रीडा करावयास उत्तेजित करीत असते, व ती मला त्याच्या खोल अशा कुहरामध्ये डोकवावयास लावते. परंतु त्याचबरोबर ती माझी जीवनप्रेरणा मला तिचा गुलामही बनवीत नाही. आणि अशा रीतीने आम्ही परस्परांविषयी आदर बाळगत असतो. कदाचित् मी एखादा वैमानिक व्हावयास पाहिजे होते. म्हणजे ज्या ज्या वेळी मला जीवन सुस्त व नीरस वाटू लागले असते त्या त्या वेळी मी आकाशात उंचवर मेघांच्या घनसंमर्दात उड्डाण करून गेलो असतो. ... जीवनाच्या ह्या कृतीविषयीच्या अभिलाषेने कृतीमार्फत जीवन अनुभवण्याच्या तीव्र कामनेने माझे विचार व कृती प्रभावित झालेल्या आहेत. किंबहुना अप्रतिहत विचार करणे ही पण एक प्रकारची कृती आहे, असे असूनही तसे करणे हेही पुढे माझ्याकडून होणाऱ्या कृतीचा एक भाग बनलेले आहे. माझे विचार करणे हे ज्याचा कृतीशी व जीवनाशी कोणत्याही प्रकारचा संबंध नसतो अशी शून्यात घडणारी अमूर्त घटना नसते. भूतकाल हा वर्तमानाच्या कृतीत अवतीर्ण होतो आणि भविष्य त्यापासून निर्माण होतो. भूत, वर्तमान व भविष्य हे परस्पराशी संबद्ध होऊन परस्परात जणु गुंफले जातात." "(भारताचा शोध पृ. ९–१०). अशाप्रकारे नेहरूंची प्रकृति कृतिप्रवणतेची होती. त्यांच्या दृष्टीने जीवन हे कृतीतून व्यक्त होत असते व जीवनातील विचार व चिंतन हे कृतीभोवती गुंफलेले असावयास पाहिजे. चिंतन हे केवळ मुक्त कल्पनाविहार राहता कामा नये. नेहरूंना प्रचंड आकर्षण होते ते सळसळणाऱ्या जीवनाचे, चढउतारांनी परिपूर्ण, आशानिराशांनी उद्दीपित होणारे, भावना व विचार यांच्या संमिश्रणाने दोलायमान होणाऱ्या अशा जीवनाचे. आपल्या आत्मचरित्रात ते म्हणतात– "मला ज्यावर सदैव वादळे व झंझावत उठतात असा उघडा समुद्र अधिक बरा वाटतो. मृत्यूनंतर ह्या जीवनास काय होणार आहे ह्याविषयी मला मोठेसे कुतूहल व आस्था वाटत नाही. या जीवनाच्या समस्या माझ्या मनाला गुंतवून ठेवण्यास पुरेशा आहेत." (पृ. ३७७). स्वतःविषयी ते आपल्या भारताचा







शोध या पुस्तकात लिहितात– " प्रामुख्याने मला याच जगात रस व आस्था वाटते. दुसरे कोणते तरी जग किंवा भावीजीवन याविषयी मला फारसा रस वाटत नाही. ' आत्मा ' नावाचा काही पदार्थ असतो की काय, किंवा मृत्यूनंतर आपणास अस्तित्व असते की नाही, हे प्रश्न मला सतावीत नाहीत. आणि हे प्रश्न जरी महत्त्वाचे असले तरी मला त्यांचा काहीच त्रास वाटत नाही. तरीपण मी ज्या वातावरणात वाढलो आहे ते आत्मा, भावीजन्म, कार्यकारणाचा कर्मसिद्धान्त, पुनर्जन्म ह्या गोष्टी गृहीतच धरते. माझ्या-वरही त्यांचा पगडा बसलेला आहे व ह्या गृहीततत्त्वा-विषयी मी काहीसा अनुकूल वृत्तीचा आहे. ... मला वाटते अशा अज्ञात प्रांतातील विचार व आपल्या उपपत्ती हे केवळ बुद्धीचे खेळ मात्र आहेत. त्यांचा माझ्या जीवनावर परिणाम होत नाही आणि नंतर ते बरोबर किंवा चुकीचे ठरले तरी त्यांचा माझ्यावर मुळीच परिणाम होणार नाही " ( भा. शो. १६ ) याप्रमाणे नेहरूंची वृत्ति ही परलोकपर नसून इहलोकपर होती. या जगाचे व पृथ्वीवरचे जीवन हे सुंदर, न्यायी, सुखी व समृद्ध करावे हीच त्यांची मूलभूत जीवनप्रेरणा होती. ते पारलौकिक जीवनासंबंधी उदासीन होते. मृत्यूनंतर जीवन असते की नसते, पुनर्जन्म असतो की नसतो इत्यादि प्रश्न कदाचित् महत्त्वाचे असू शकतील; त्यांना एक तात्त्विक व धार्मिक बाजू असेल; पण त्यात त्यांना रस वाटत नव्हता कारण अशा प्रश्नांना निश्चित होकारार्थी किंवा नकारार्थी उत्तरे देता येत नाहीत व उभयपक्षी काही सिद्धही करता येत नाही. आणि केवळ स्वैर कल्पनाविलास करीत बसण्यात वेळ व शक्ती न दवडता या लोकीचे आपले जे जीवन आहे तेच सुसह्य, सुंदर, न्यायी व आदर्श बनवावे, त्यातच मानवाने आपला पुरुषार्थ व्यक्त करावा असे व्यवहार्य, मर्यादित व नम्र ध्येय त्यांनी आपल्या समोर ठेविले होते. एकप्रकारची उच्च उपयुक्ततावादी अशी त्यांची वृत्ती होती. तरीपण जीवनाच्या थोर व उच्च आदर्शांनी जीवनाला जी उदात्तता प्राप्त होत असते तिच्याकडे ते दुर्लक्ष करीत नसत. मानवीजीवनाला जो अर्थ व जे महत्त्व प्राप्त होते ते मानव ज्या उच्च आदर्शांना स्वतःच्या व समाजाच्या जीवनात साकार करण्यासाठी धडपडतो व जरूर पडल्यास त्यासाठी आपल्या सर्वस्वाचा त्याग करावयासही सिद्ध असतो अशा उदात्त ध्येयामुळेच, असेही ते म्हणतात.

नेहरू हे जीवनाचे खरेखुरे उपासक होते. जरी जीवनात अनेक निराशाजनक घटना घडत असतात व उद्वेग येण्यासारखे पुष्कळच घडत असते तरी त्यांनी जीवनाचा कधी निषेध व अव्हेर केला नाही. ते म्हणतात– " आपण जीवनासंबंधी समग्र अशी दृष्टी वाढविली पाहिजे. आपल्या दृष्टीच्या विशालतेत आपण भूत व वर्तमान यांना सारखाच स्पर्श करावयास पाहिजे. जीवनाच्या उत्तुंग व खोल अशा सर्व अंगांशी संपर्क साधला पाहिजे. शांत, निर्विकार व समतोल वृत्तीने आपण भविष्याकडे पाहावयास पाहिजे, जीवनात खाचखळगे, अडचणी असतात हे खरेच, व त्यांच्याकडे दुर्लक्ष करूनही चालणार नाही. आपल्या भोवती जशी रमणीयता पसरलेली आहे तसेच जीवनात दुःख व हाल अपेष्टाही आहेत. मानवाचा जीवनामधून जो प्रवास चालू आहे, तो सुख व दुःख याचे एक चमत्कारिक संमिश्रण आहे. अशाच खाचखळग्यातून मानव शिकत व प्रगति करीत असतो. आत्म्याच्या प्रसूतिवेदना कारुण्यपूर्ण असतात, व त्या आत्म्याने एकट्यानेच अनुभवायच्या असतात. बाहेरील घटना व त्याचे परिणाम ह्याचे आपणावर जबरदस्त आघात होत असतात, तरीपण आपल्या मनाला जबरदस्त तडाखे बसतात ते आपल्या अंतरंगातील भीति व संघर्ष यामुळे. आपणास जर जगावयाचे असेल तर आपणास बाह्य जगात सतत प्रगती करावीच लागते; व तशी आपण करीत असताना आपणास आपल्या अंतरंगात आत्म्याशी सामरस्य साधून शान्ति मिळविली पाहिजे ...... मानवाच्या प्रवासास काही अंतिम उद्दिष्ट व प्रयोजन आहे की नाही हे आपणास ठाऊक नाही. त्याच्या प्रवासाचा त्याला काही मोबदला व भरपाई मिळत असते. जवळची काही उद्दिष्टे प्राप्त झाल्यावर त्यांच्यापासून तो पुढील प्रगतीच्या साहसी प्रवासाला पुनः नव्या दमाने सुरवात करीत असतो. " ( भा. शो. ६२६ )

नेहरूंना जीवनाच्या अनंतत्वाची, विराटत्वाची व पूर्णतेची संपूर्णपणे जाणीव होती. मानवाने आपल्या परिश्रमाने जे मिळविले आहे ते मर्यादित व अल्प












असूनही त्याच्या पलीकडे विशाल असे जीवन पसरलेले आहे, व मानवाने आतापर्यंत जे मिळविले आहे त्याच्या सहस्रपटींनी अधिक असे त्याला त्याच्या बुद्धीच्या व क्रियाशील सर्जनतेच्या साहाय्याने मिळविता येईल याविषयी त्यांना शंका नव्हती. नेहरूंचा मानवाच्या क्रियाशीलतेवर, कल्पक सर्जनतेवर व पुरुषार्थावर संपूर्ण विश्वास होता. अडचणी व अरिष्टे ह्यांनी माणसास निराश वाटणे साहजिक आहे, हे त्यांना मान्य होते, तरी पण कोणत्याही अडचणींवर व संकटांवर आपली कल्पकता, क्रियाशील सर्जनता व पौरुष यांच्या साहाय्याने मानवास निश्चितपणे मात करता येईल व कोणत्याही भौतिक शक्तीपुढे मानव सहसा निमूटपणे हार खाणार नाही अशी त्यांची श्रद्धा होती. मानवाने बिकट परिस्थितीने निराश व निरुत्साही न होता सदैव आपला पुरुषार्थ जागृत ठेवून व आत्मविश्वास वाढवीत राहून सर्व आपत्तींशी झुंजत राहून सर्व अरिष्टांवर विजय मिळविला पाहिजे, अशी झुंजार व विजिगीषु क्षत्रिय बाण्याची नेहरूंची वृत्ती होती.

जीवनाच्या व्यापकतेविषयी ते म्हणतात– " जीवन व निसर्ग या संबंधी आपणास जेवढे अधिक ज्ञान होते तेवढे आपण अतिभौतिक दैवी कारणाकडे कमी आशेने पाहातो. जे आमणास कळते व ज्यावर आपले नियंत्रण चालते त्याची आपणास गूढता वाटेनाशी होते. शेती, अन्न, कापड, सामाजिक संबंध यासंबंधी विज्ञानाने बरेचसे ज्ञान करून घेतले असल्याने त्यासंबंधी आपणास वाटणारी अनाकलनीय गूढता कमी झालेली आहे. तरीही बऱ्याचशा अतिभौतिक शक्ती व वस्तूसंबंधी आपणास कुतूहल व गूढता वाटते. त्यांच्याविषयी आपल्या मनात धार्मिक श्रद्धा व अंधःश्रद्धा वसत असतात. विश्वाचे अंतिम गूढ हे मानवी मनाच्या आवाक्याच्या बरेच पलीकडे आहे व ते तसेच अनाकलनीय राहण्याचा संभव आहे. जीवन हे अनंत, विराट व अत्यंत समृद्ध आहे. ते आपणास सौंदर्याचे दर्शन घडविते; एवढेच नव्हे तर ते आपणास रोमांचकारी साहसे उपलब्ध करून देते व कधी न संपणारे शोधही लावत असते; आणि त्यांच्यामार्फत जीवनाची समृद्धी, श्रीमंती, विविधता व पूर्णता यांचे अधिकाधिक व्यापक दर्शन घडवीत असते. म्हणून आपण तत्त्वज्ञानयुक्त अभिवृत्तीने विज्ञानाचा पाठपुरावा केला पाहिजे. विज्ञानाच्या साहाय्याने आपणास जे ज्ञान झालेले आहे त्याच्या पलीकडे जे विस्तृत जीवन पसरलेले आहे त्याविषयी मनात आदर बाळगला पाहिजे व जीवनाप्रत अभिमुख राहिले पाहिजे. " (भा. शो. ६२५–२६ )

नेहरू हे संकटांना, आपत्तींना, अरिष्टांना व अडचणींना भिणारे व भीक घालणारे कधीच नव्हते. उलट संकटे व आपत्तींच्या प्रसंगी त्यांना जणु एक आह्वान मिळाल्यासारखे वाटे. माणसाच्या ठिकाणी असणारे सुप्त सामर्थ्य, शौर्य व धैर्य यांच्या व्यक्तीकरणास आपत्तीमुळे चांगली संधी लाभते, म्हणून आपत्तींना न टाळता त्यांचे मानवाने स्वागतच करायला पाहिजे असे नेहरूंचे मत होते. रविन्द्रनाथ म्हणतात त्याप्रमाणे वेळ पडल्यास ' एकला चलोरे ' किंवा ' बचेंगे तो औरभी लढेंगे ' अशी त्यांची निर्भयपणे आदर्शाप्रत मार्गक्रमण करण्याची स्थायी वृत्ती होती. निर्भयता, साहसप्रियता, शौर्य व धैर्यशीलता हे त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील महत्त्वाचे गुण होते. आपल्या ' भारताचा शोध ' या ग्रंथाचा उपसंहार करताना ते म्हणतात– " आपण काही एखाद्या क्षुद्र राष्ट्राचे नागरिक नाही. आपणास आपल्या जन्मभूमीचा, आपल्या देशबांधवांचा, आपल्या संस्कृतीचा व परंपरांचा जरूर अभिमान वाटतो. परंतु केवळ आपल्या जुन्या वैभवशाली भूतकालाचा अभिमान धरून व त्यालाच भावनाविवशतेने आपणास चिकटून राहून चालणार नाही. आपल्या ठिकाणी काही दोष व उणीवा आहेत त्यांच्याकडे आपण दुर्लक्ष करता कामा नये. आपणास अद्याप खूपच लांबचा व कष्टाचा प्रवास करावयाचा आहे. मानवी संस्कृती व प्रगती यांच्या क्षेत्रात आपणास अपार कष्ट करून इतर पुढारलेल्या राष्ट्रांच्या मालिकेत जाऊन बसावयाचे आहे. आपण घाई करावयास पाहिजे. आपणास विकासासाठी अवधी फार थोडा आहे. कारण जग फारच झपाट्याने प्रगती करीत आहे. इतर संस्कृतींना आवाहन करणे व त्यांना आपणामध्ये मिसळून घेऊन आत्मसात् करणे हा भारताचा प्राचीन मार्ग आहे. ह्या दृष्टीची आपणास सध्यांच्या काळात जास्तच गरज आहे. कारण आपण उद्याच्या जगताकडे कूच करीत आहो. उद्याच्या जगतात








सर्व राष्ट्रीय संस्कृती ह्या मानवजातीच्या एका आंतरराष्ट्रीय संस्कृतीत मिसळून जाणार आहेत. म्हणून आपण जेथे जेथे शक्य होईल तेथे तेथे शहाणपण, ज्ञान, मैत्री व सहयोगिता मिळविली पाहिजे. सर्व सामायिक कार्यात आपण इतरांशी सहकार्य करावयास पाहिजे. परंतु आपण दुसऱ्यांकडे त्यांच्या कृपेसाठी याचकाच्या भूमिकेतून पाहणार नाही. आपण भारतीय व आशियायी राहूच, पण त्याचबरोबर आपण आंतरराष्ट्रीय व अखिल जगताचे नागरिकही बनू, " ( भा. शो. ६९० )

भारतभूमीस अपार कष्टांनी सुजला, सुफला, सर्व दृष्टींनी समृद्ध व गौरवशाली बनविण्यासाठी स्वखुषीने व आनंदाने आपण जिवापाड श्रम केले पाहिजेत व स्वप्रयत्नांनी आपले सामाजिक व राष्ट्रीय जीवन समृद्ध, स्वावलंबी व स्वाभिमानी बनविले पाहिजे असा नेहरूंचा संदेश आहे.

स्वातंत्र्यप्राप्तीसाठी त्याकाळच्या पिढीने जे अतोनात हाल सोसले, त्याग केले, बलिदान केले त्याबद्दल नेहरूंना कमालीचा अभिमान व समाधान वाटे. स्वातंत्र्यासाठी सर्वस्वाचा होम करणाऱ्या तत्कालीन लोकांचे जीवन एक दिव्य भावनेने भारलेले होते व रोमांचकारी होते. या पिढीविषयी नेहरू म्हणतात– " माझी पिढी ही भारतात व जगतात पीडित अशी होती. आणखी काही दिवस आम्ही अशाच हाल अपेष्टा भोगू. परंतु एके दिवशी आमचा येथून अस्त होईल. आम्ही मग इतर नव्यांना जागा करून देऊ. ते त्यांची जीवने जगतील व त्यांच्या जीवनाचे भारे प्रवासाच्या पुढील टप्प्यापर्यंत घेऊन जातील. जो काळ आता त्याच्या उपसंहाराजवळ येऊन ठेपला आहे त्यात आम्ही आमचे कार्य कसे बजावले ? मला ते माहित नाही. यानंतरच्या काळातील इतर माणसे त्याचे मूल्यमापन करतील. कोणत्या मापाने आपण यश किंवा अपयश मोजणार ? तेही मला सांगता येणार नाही; कारण आम्ही जे केले ते स्वखुषीने निवडले व पत्करले होते. आणि कदाचित् शेवटी आमचे आयुष्य फार वाईट गेले असेही म्हणता येणार नाही. कारण जे सदैव मृत्यूच्या सीमेवर उभे असतात फक्त त्यांनाच जीवनाची खरी चव कळते, अर्थ समजतो. ज्यांची जीवने मृत्यूच्या भीतीने ग्रासलेली नसतात त्यांनाच जीवनाची खरी लज्जत समजते, उपभोगता येते. आम्ही कितीही व कोणत्याही चुका केलेल्या असोत आम्ही क्षुद्रतेपासून व आंतरिक शरम व भित्रेपणा यापासून स्वतःला जरूर वाचविले आहे. आमच्या वैयक्तिक दृष्टीने पाहता ती आमची कमाईच आहे." यापुढे लेनिनचे खालील शब्द वापरून पंडितजींनी आपल्या ग्रंथाचा समारोप केलेला आहे– " माणसाची सर्वात प्रिय व मौल्यवान् संपत्ति आहे त्याचे जीवन, ते जगण्यासाठी त्याला केवळ एकदाच दिले जात असल्यामुळे त्याने ते अशारीतीने जगावयास पाहिजे की आपल्या क्षुद्र व भित्रेपणाच्या केलेल्या कृत्यासाठी शरमेने आपणास खाली मान घालण्याची त्याच्यावर पाळी येता कामा नये. कोणत्याही प्रयोजनाशिवाय वर्षानुवर्षे आपणास रखडत आपले जीवन जगावे लागता कामा नये. मानवाला असे जगता आले पाहिजे की मरणाच्या क्षणी त्याला असे म्हणता आले पाहिजे की– " जगातील सर्वश्रेष्ठ जे ध्येय आहे– ते म्हणजे मानवजातीची मुक्ति– त्यासाठी मी माझे संपूर्ण जीवन व शक्ती वेचली आहे. " ( भा. शो. ६९१ ) अशारीतीने सदैव मृत्यूच्या उंबरठ्यावर उभे राहून जीवनाकडे पाहणारे व जीवन जगणारे जवाहरलाल होते. त्यांना मृत्यूपेक्षा क्षुद्रपणाचे जगणे, करंटेपणाचे जगणे अधिक घृणास्पद व भयानक वाटे. आपल्या सबंध हयातीत त्यांनी सुरक्षितता, स्वास्थ्य, सुख, स्थिरता ह्यांचा कधी हव्यास धरला नाही. उलट, सतत आंदोलने करून, नवनवीन विचारांच्या लाटा उठवून भारताच्या निद्रिस्त जनतेस उठवून, जागे करून सर्व प्रकारची सामाजिक व वैयक्तिक प्रगति करण्यासाठी त्यांनी सदैव स्वतःला जागरूक ठेविले. ते स्वतः उत्साही, आशावादी, साहसी व कार्यरत राहिले. संथ, शांत, अप्रवाही जीवनाचे त्यांना आकर्षण नव्हते. नेहरू म्हणजे जणु लवलवणारी वीज. सतत तळपणे, धडपडणे, कार्यरत राहणे, चैतन्याच्या लाटा उठविणे व जीवनाचा जिवंत आविष्कार करीत राहणे हाच त्यांचा खरा स्वभाव होता. म्हणून गतिमान्, प्रवाही, उफाळणारे, उचंबळणारे, विकसणारे, नवसर्जनकारी जीवन हेच त्यांना मोलाचे वाटे. योग्याची शांति व स्थिरता त्यांना कधी आकर्षणीय वाटली नाही.

जीवन हे अनंत, सनातन, अविनाशी व अपरिमेय आहे. त्याला आदि होता व अंत येणार आहे की नाही










हे कोण सांगू शकणार ? जीवनाला दोन अंगे असतात– एक परिवर्तनशील, बदलणारे व दुसरे न बदलणारे– अपरिवर्तनशील– सर्व कालात व अवस्थात स्थिर, अविचल व अविनाशी राहणारे. जे स्थिर, अविचल व अविनाशी असते ते सर्व अवस्थात अन्तर्भूत राहून बदलणाऱ्या अवस्थांबरोबर ते वाहून जात नाही. ते सनातन जीवन अविकारी असते व विकारी भाग हा देशकालाच्या स्वरूपाप्रमाणे बदलत राहतो असे पंडितजींनाही वाटत होते. ते म्हणतात– " भारताने त्याच्या बऱ्याचशा गतकालीन गोष्टींचा त्याग केला पाहिजे. त्याच्या गतकालीन कल्पना व परंपरा यांनी त्याच्या वर्तमान जीवनावर प्रभुत्व गाजविता कामा नये. गतकालाच्या जीर्ण ओझ्याखाली आपले जीवन पिचून गेलेले आहे. ज्याचे प्रयोजन संपलेले आहे व जे जीर्ण व मृत झालेले आहे ते गेले पाहिजे. परंतु ह्याचा अर्थ असा मात्र नाही की भूतकालात जे जीवनदायी व प्राणमय होते तेही आपण विसरायला किंवा टाकून द्यावयास पाहिजे. आपल्या पूर्वजांना ज्या आदर्शांनी प्रेरणा दिलेली होती ते आदर्श, युगायुगात भारतीय लोकांनी जी स्वप्ने उराशी बाळगली होती ती स्वप्ने, आपल्या ऋषिमुनींचे शहाणपण, आपल्या पूर्वजांचे जीवन व निसर्गावरील ओतप्रोत प्रेम, त्यांचे विचारातील साहस, साहित्यातील कला व संस्कृती यात त्यांनी केलेली आश्चर्यकारक निर्मिती व कामगिरी, त्यांचे सत्य, सौंदर्य व स्वातंत्र्याविषयींचे प्रेम, त्यांनी प्रस्थापित केलेली मूलभूत मूल्ये, जीवनाच्या गूढवाटांचे त्यांना झालेले आकलन, आपल्या स्वतःच्या मार्गाहून भिन्न अशा मार्गाविषयी त्यांनी बाळगलेली सहिष्णुता, जगातील इतर लोक व त्यांनी निर्मिलेल्या मौल्यवान सांस्कृतिक गोष्टी यांना आत्मसात् करून त्यांचे संश्लेषण करून त्या सर्वांपासून संमिश्र व बहुरंगी अशी नवी व्यापक संस्कृती घडविण्याची त्यांची कुवत इत्यादी-सारख्या पूर्वजांच्या अनेक गोष्टी आपण कधीही विसरू शकणार नाही. आपली प्राचीन जमात ज्या असंख्य अनुभवांनी घडविली आहे व जे आपल्या अन्तर्मनात खोलवर रुजून राहिलेले आहेत ते आपण कधीही विसरू शकणार नाही, व त्याच्याविषयी आपणास आदर वाटणे कधीही थांबणार नाही. भारत जर ह्या मौल्यवान गोष्टी विसरला तर तो मुळी भारतच राहाणार नाही; आणि ज्यामुळे भारत आपले आनंद व अभिमान–निधान बनला आहे ते संपुष्टात येईल. " ( भा. शो. ६२० ) – अशा प्रकारे भारताची प्राचीन कालातील अभिमान वाटण्याजोगी कमाई नेहरूंना पूर्णपणे मान्य होती. किंबहुना ज्या भव्य, दिव्य, सुंदर व निर्दोष वस्तूंची भारताने निर्मिती केली व युगानुयुगेही ज्या गोष्टी मौल्यवान ठरल्या आहेत त्यांच्या-संबंधी आदर व प्रेम बाळगून त्यांची आपण काळजी-पूर्वकपणे व निश्चयाने जोपासना केली पाहिजे, असाही त्यांचा आग्रह होता. ते पुढे म्हणतात– " ह्या अशा वर दिलेल्या गोष्टींचा नाही आपणास त्याग करावयाचा. परंतु धूळ, कोळिष्टके व जळमटे यांनी युगायुगात भारताच्या अंतिम सौंदर्याला व महत्त्वपूर्ण अर्थाला झाकळून टाकलेले आहे. भारताच्या आत्म्यावर ज्या अनावश्यक विकृत गोष्टींची वाढ झालेली आहे व ज्यांनी त्याचे मूळ स्वरूप दुमडून टाकले आहे व त्याला जड बनवून व त्याला निर्जीव अशा चौकटीत बसवून त्याचा विकास खुरटवून टाकला आहे त्यांचा आपण त्याग केला पाहिजे. त्यावर वाढलेली अशी ही बांडगुळे आपण तोडून टाकली पाहिजेत, व भारताच्या प्राचीन प्रज्ञानाचे पुनः नव्याने स्मरण केले पाहिजे; आणि त्याची आताच्या बदलत्या परिस्थितीशी जुळणी केली पाहिजे. भारताच्या अशा कित्येक विचारांच्या व आचारांच्या परंपरा आहेत की त्या प्राचीन काळात खरोखरच मौल्यवान ठरल्या होत्या. त्यांनी त्या काळात आपल्या लोकांचे पुष्कळच भले केले होते, व त्यांच्या ठिकाणी पुष्कळच चांगला भाग होता. परंतु त्या परंपरा नव्या काळास अनुरूप ठरत नसल्याने आपण त्यांचा आता त्याग केला पाहिजे. आता आपण आपले स्वतःचे नवे विक्रम केले पाहिजेत व मानवाच्या साहसी वृत्तीला आवाहन करून उत्तेजित केले पाहिजे. आणि आता पूर्वीपेक्षा या साहसीवृत्तीची अधिकच गरज आहे. कारण आता आपले मानवामानवामधील देश, वंश यासारखे भेद नष्ट होत आहेत व सर्व मानवजातीस सामायिक असे बरेच निर्माण होऊ लागले आहे. देश, जाति, धर्म यांच्या मर्यादा ओलांडून आता आपण अखिल मानव-जातीचा एकत्रित विचार करू लागलो आहोत. आपण आता सत्य, सौंदर्य व स्वातंत्र्य याविषयींचे आपले प्रेम पुनरुज्जीवित केले पाहिजे. हे सत्य, सौंदर्य व



अनुक्रमणिका






स्वातंत्र्याविषयींचे प्रेम आपल्या जीवनास अर्थ प्राप्त करून देत असते. ह्या मूल्यांच्या मजबूत पायावर आपल्या पूर्वजांनी आपले घर उभारले होते व ते त्यांचे वैशिष्ट्य समजले गेले होते. त्यांचा गतिमान दृष्टिकोन व साहसप्रियतेची वृत्ती आपण वाढविली पाहिजे. मानवाच्या इतिहासाच्या व प्रयत्नांच्या अरुणोदयापर्यंत आपल्या स्मृती पसरत जातात, म्हणून आता आपण खूपच प्रौढ बनलो आहोत. पण त्याचबरोबर आपल्या सध्यांच्या काळाशी समरस होऊन आपण पुन: नव्याने तरुण बनावयास पाहिजे. तरुणाच्या दुर्दम्य आनंदाने व उत्साहाने आपण वर्तमानात तरुण म्हणून जगावयास पाहिजे व भविष्यकालावर श्रद्धा ठेविली पाहिजे. ''

" जर सत्य ही अंतिम सत्ता असेल तर ते शाश्वत, अविनाशी व अपरिवर्तनशील असले पाहिजे. पण अशा अनन्त, शाश्वत व अपरिवर्तनशील सत्याचे मानवाच्या सान्त मनाला पूर्णतया आकलन होऊ शकत नाही. त्या अमर्याद सत्याचे देश व काल यांनी आणि मानवाचा ज्या अवस्थेपर्यंत विकास झालेला आहे त्या अवस्थेपर्यंत व सध्याच्या प्रचलित वैचारिक प्रणालींनी मर्यादित अशा फार तर काही मर्यादित अंशाचेच आकलन आपल्या मर्यादित मनाला करून घेता येते. जसाजसा मनाचा विकास होतो व त्याच्या कक्षा रुंदावतात, जशा प्रणाली विस्तृत होऊ लागतात व ते सत्य व्यक्त करण्यासाठी नवी प्रतीके वापरली जातात तसतशी त्यांची नवीन अंगे व पैलू प्रकाशात येऊ लागतात, आपणास उमगू लागतात; मात्र कदाचित् त्याचा मूळ गाभा तसाच कायम रहात असेल; आणि म्हणून सत्य हे नेहमी शोधावे लागत असते व त्याचे पुनर्नवीकरण करीत रहावयाचे असते, त्याला नवे आकार द्यावयाचे असतात व त्याचा विकास घडवीत राहावयाचा असतो. असे केले म्हणजे सत्य माणसाला ज्या रूपाने समजते ते मानवाच्या जीवनाचा जसजसा विकास होत राहतो व त्याचे विचार जसजसे बदलत जातात त्याच्याशी ते सत्य सुसंवादी बनत रहाते. जर सत्य असे विकसनशील राहिले तर ते मानवतेच्या दृष्टीने जिवंत सत्य बनते; ज्याची आकांक्षा मानवजात धरते ती आकांक्षा ते पूर्ण करते व ते वर्तमानकालात व भविष्यकालासाठी मानवजातीस मार्गदर्शन करीत राहाते. " (भा. शो. ६२१)

चिरंतन सत्याच्या विनाशी व अविनाशी भागामध्ये विवेक करावयास पाहिजे. सत्याचे विकारी स्वरूप अविकारी स्वरूपापासून वेगळे करावयास पाहिजे व चिरंतन सत्याचा अविकारी व अपरिवर्तनशील गाभा कायम ठेवून त्याचे विकारीस्वरूप कालमानाप्रमाणे ठरवायला पाहिजे असेही नेहरू म्हणतात. ते पुढे म्हणतात– "पण जर गतकालातील सत्याचा एखादा भाग, अंग किंवा अंश हा अत्याग्रहामुळे जड बनला, त्याचे अश्मीभवन झाले, तर ते सत्य जिवंत, प्रवाही आणि विकसनशील राहात नाही. ते मानवतेच्या बदलत्या गरजांची पूर्ती करण्यास व त्यांच्याशी जुळणी करण्यास समर्थ राहात नाही. त्याची इतर अंगे लुप्त व अज्ञात राहतात व नंतरच्या युगात ज्या महत्त्वाच्या व निकडीच्या समस्या निर्माण होतात त्यांना उत्तर देण्यास ते असमर्थ बनते. ते गतिमान् न राहता स्थिर व अपरिवर्तनशील बनते. ते मग जीवनदायी व प्रेरक न राहता जीर्ण व केवळ शिष्टाचारात्मक बनते व पुढे ते मानवाच्या व मानवतेच्या विकासास प्रतिरोधक बनते. भूतकाळात ते वाढत होते व त्या कालाची भाषा, प्रतीके आणि संकेत यातून जेव्हा ते वाढत होते व त्या कालाची भाषा, प्रतीके व संकेत यातून जेव्हा त्याला व्यक्त करण्यात आले तेव्हा ते ज्या प्रमाणात समजले होते तितके स्पष्टपणे आता समजतही नाही. कारण नंतरच्या काळात त्याचा संदर्भ वेगळा असतो. नंतर मानसिक वातावरण बदललेले असते, नव्या सामाजिक सवयी व रूढी वाढीस लागलेल्या असतात आणि प्राचीन काळातील लिखाणाचा अर्थ व त्याचे मर्म समजणेही अवघड होत असते. आणि शिवाय श्री. अरविंद म्हणतात त्याप्रमाणे प्रत्येक सत्य हे आपल्यापुरते कितीही सत्य असले तरी ते इतर सत्यापासून अलिप्त केल्यास ते बुद्धीस बांधून टाकण्यासाठी एक सापळा बनते व मग ते माणसास अयोग्य मार्गाने नेते व त्याचे अत्याग्रहात रूपान्तर होते; कारण प्रत्येक इतर सत्य एका सत्यास जशी मर्यादा घालते तसे त्यास पूर्णही बनविते. कारण वास्तवात प्रत्येक विशिष्ट सत्य हे गुंतागुंतीच्या जाळयाचा फक्त एक धागा असते व








कोणताही एक धागा संपूर्ण जाळ्यापासून वेगळा करता येत नाही. " ( भा. शो. ६२२ )

अशारीतीने सत्य हे अतिविशाल, अमर्याद, अनंत, बहुरंगी व अनंतागी असते व चिरसत्य हे अविनाशी व अपरिवर्तनीय असते अशी नेहरूंची धारणा होती. प्रत्येक असत्य हे खरे म्हणजे व्यापक सत्याचा मर्यादित व संकुचित भाग असते; म्हणजे अंशसत्य हे असत्य होते; व केवळ संपूर्ण सत्य हेच खरे सत्य ठरते. असत्याकडून सत्याकडे जाण्यासाठी सत्याचे अधिकाधिक व उत्तरोत्तर व्यापक स्वरूप समजावून घ्यावयास पाहिजे. अनंत सत्य कधीच पूर्णत्वाने व्यक्त व साकार होऊ शकत नाही. संपूर्ण सत्याचा बराचसा भाग अव्यक्तच राहतो व ते एखाद्या विशिष्ट देशकालात आपल्या पूर्णत्वाने कधीच व्यक्त होऊ शकत नाही. त्या अनंत व अमर्याद सत्याचे फक्त काही विशिष्ट पैलूच किंवा अंगे विशिष्ट काली त्या त्या कालमानाप्रमाणे व जाणणाऱ्या मनाच्या कुवतीप्रमाणे अनुकूल अशा संदर्भापुरते प्रतीत होत असतात व समजत असतात. सान्त मानवी मनाला संपूर्ण सत्य हे कोणत्याही विशिष्ट कालात व परिस्थितीत समजू शकत नाही; कालमानाप्रमाणे ते विविध रूपांनी मानवी मनाला व्यक्त स्वरूपात समजत असते. त्याची अव्यक्त रूपे हे व्यक्त रूपापेक्षा अनंतपटींनी विस्तृत व विविध प्रकारची असतात व प्रत्येकास सत्य आपापल्या परीने व आपापल्या माध्यमाच्या मर्यादेत समजत असते. एका दृष्टीने प्रत्येकालाच सत्य समजत असते व कोणाही एकाचे किंवा काही अनेकांची एकत्रित सत्ये ही संपूर्ण व समग्र सत्य असू शकत नाहीत. आणि म्हणून सत्याच्या प्रत्येक व्यक्तरूपास किंवा आविष्कारास त्या त्या मर्यादेत का होईना पण आपण समजावून घेतले पाहिजे व तेवढा तरी आदर दाखविला पाहिजे. मला एकट्यालाच किंवा एखाद्या समूहालाच जे तीव्रतेने सत्य वाटते तेवढेच सत्य नसते; इतरांजवळही सत्य असते ही काहीशी नम्रतेची भूमिका ठेविल्यास इतरांच्या सत्यासही आपण आदर दाखविला पाहिजे हे पटू शकेल. ' मी तेवढा खरा व बाकीचे ते खोटे ', ' केवळ मजजवळ संपूर्ण सत्य आहे व इतरांचे संपूर्ण असत्य आहे ' अशी भूमिका घेणे हे नेहरूंच्या मते बुद्धिदुष्ट, अविवेकाचे, अत्याग्रहाचे व आततायीपणाचे ठरते व त्यामुळे इतरांवर अन्याय होऊ लागतो. व्यापक सत्याविषयी आपण आदर बाळगू तर इतरांच्या सत्यासंबंधी आपणास अनादर दाखवून चालणार नाही; व म्हणून इतरांच्या मतासंबंधी सहिष्णुतेची, परमतसहिष्णुतेची भूमिका आपण घ्यावयास पाहिजे. परमतआदर, परमत-सहिष्णुता हे मान्य झाले की त्यापासून 'शांततापूर्ण सहजीवन ' हे निगमित होते व अशारीतीने अनाक्रमणाच्या भूमिकेवरून शांततापूर्ण सहजीवनाच्या व सहिष्णुतेच्या तत्त्वांचा अवलंब करावा लागतो; हे तर्कशास्त्र नेहरूंच्या ' पंचशीला'च्या तत्त्वाच्या बुडाशी आहे. अंतिम सत्य मर्यादित तर नसतेच पण ते देशकालास अनुसरून विकसनशील व गतिमानही असते व बदलत्या काळात त्याची बदलती रूपे आपणास समजावून घेता आली पाहिजेत, असे नेहरूंचे मत आहे.

भारतात व भारताबाहेर जगात सध्या आपण बरेचसे घोषणा व ठराविक छापाची वाक्ये ह्यांच्या बंधनात अडकलो आहोत. ह्या घोषणा व ही ध्येयवाक्ये जुन्या घटना व प्रणाली यांच्यापासून निष्पन्न झालेल्या असून सध्याच्या काळाशी त्यांचा तेवढासा सुसंवादी संबंध नाही. परंतु त्या घोषणा प्रामुख्याने हल्लीच्या परिस्थितीचे तर्कशुद्ध व निर्विकार चित्ताने विचार करण्यापासून आपणास परावृत्त करीत आहेत. त्याचप्रमाणे अमूर्त व संदिग्ध अशी ध्येये निर्माण करून त्यांच्या साहाय्याने भावनांचे उद्दीपनही सध्या केले जात आहे. पण त्यामुळे मनात गोधळ निर्माण होतो व मन स्पष्ट व तर्कशुद्ध विचार करण्यास अक्षम बनून ते अधिक अवास्तविक बनू लागते. म्हणून सत्य हे निर्विकारपणे व वस्तुनिष्ठ दृष्टीने समजावून घेतले पाहिजे. " ( भा. शो. ६४८ )

सत्य हे विविधांगी, व्यापक व विकसनशील असते व आपले मन दुराग्रही, अत्याग्रही व संकुचित न ठेवता निर्विकार व जिज्ञासू वृत्तीने त्याच्या विकसनशील विविध रूपात आपण त्याचा साक्षात्कार करून घेतला पाहिजे ही नेहरूंची आवडती कल्पना आहे व ती त्यांच्या उदारमतवादाच्या पार्श्वभागी असे.

नेहरू पुढे म्हणतात " आपल्या देशात व त्याचप्रमाणे इतर राष्ट्रात आत्मगौरवाची तशीच आत्म-








कार्पण्याची भावना दिसून येते. या दोन्ही वृत्ती अयोग्य व अनुदात्त आहेत. भावना व विकार ह्यांच्या आधीन न होता आपण मोकळेपणाने व धैर्याने वस्तुथितीला तोंड देऊन जीवनाचा अर्थ समजावून घ्यावयास हवा. जीवनाशी ज्यांचा काही संबंध नाही अशा निरुद्दिष्ट व कल्पनारम्य अन्वेषणात आपण वाहवत जाता कामा नये; कारण नियतीचा प्रवास पुढे चालूच आहे, आणि ती आपल्या सवडीसाठी थांबत नाही. त्याचप्रमाणे मानवाच्या आंतरिक जीवनाचे महत्त्व विसरून आपण केवळ बाह्य विश्वात गुंतून राहून चालणार नाही. माणसाचे आंतरिक व बाह्य जीवन यात समतोल व सुसंवाद निर्माण करण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे; त्यांच्यात मेळ व सामरस्य असले पाहिजे. स्पिनोझा म्हणतो की मानवी मन व संपूर्ण निसर्ग ह्यांचे ऐक्य व समन्वय ह्यांचे ज्ञान हे सर्वात मोठे शिव होय. आपल्या वैयक्तिक जीवनात आपण शरीर व आत्मा, निसर्गाचा एक भाग म्हणून असलेला मानव व समाजाचा एक घटक म्हणून असलेला मानव यात समतोल व सामरस्य निर्माण केले पाहिजे. गुरुदेव रवींद्रनाथ ठाकूर म्हणतात त्याप्रमाणे पूर्णता प्राप्त करून घेण्यासाठी आपण शरीराने धष्टपुष्ट व काटक वन्यमाणसे व मनाने सुसंस्कृत व्हावयास पाहिजे. निसर्गाशी वागताना आपण नैसर्गिक व मानवसमाजाशी वागताना माणुसकीने ओतप्रोत भरलेले असे असावयास पाहिजे. परिपूर्णता प्राप्त होणे ही गोष्ट आपल्या कुवती पलीकडची आहे, कारण ती मिळणे म्हणजे अंतच होणे होय. आणि आपला प्रवास तर अप्रतिहतपणे चालूच असतो. जे आपणांपासून सतत मागे मागे दूर सरत असते त्याच्या जवळ जाण्याचा आपला सतत प्रयत्न चालू राहातो. आणि आपणा प्रत्येकामध्ये अनेक भिन्न माणसे वसत असतात; ती परस्परांशी विसंगत व विरोधी असतात व जो तो आपणास वेगवेगळ्या दिशेने ओढत असतो. आपणामध्ये जीवनाचे प्रेम असते व जीवनासंबंधीची घृणाही असते. जीवनात जे जे अन्तर्भूत असते ते सर्व आपण स्वीकारतो व बऱ्याच गोष्टींना अव्हेरही करतो. अशा परस्परविरोधी गोष्टींचा मेळ घालणे ही गोष्ट कठीण असते. काही वेळा त्यांच्यापैकी एक अधिक प्रभावी असते तर काही वेळा दुसरी असते ... आपल्या बुद्धीच्या व आकलनशक्तीच्या सर्व शक्तिनिशी आणि आपले सर्व संकलित ज्ञान व अनुभव यांच्या साहाय्याने आपणास जीवनाची जी गुपिते असतात– जी गुह्ये असतात त्यांचे फारच थोडे आकलन होते, व म्हणून त्याच्या गूढ प्रक्रियासंबंधी आपण केवळ अंदाजच करीत असतो. परंतु जीवनाच्या सौंदर्याचा आपण नेहमी आस्वाद घेऊ शकतो, आणि कलेच्या द्वारा आपण ईश्वराप्रमाणे सर्जनाचे कार्य करीत असतो. आपण जरी दुबळे व प्रमादशील मानव असलो, आणि अल्पकालीन व अनिश्चित असे जीवन जगत असलो तरी आपणामध्ये अमर अशा देवांच्या द्रव्याचा काही अंश आपल्या ठिकाणी असतो. म्हणून ॲरिस्टॉटल म्हणतो– " आपण मानव व मर्त्य आहोत व आपण मानवासारख्या मर्त्य विचारांचा विचार करणारे आहोत असे म्हणणारांचे आपण आज्ञापालन करता कामा नये; आपण शक्य तेवढा अमरत्वाचा आचार केला पाहिजे, व आपणामध्ये जे जे सर्वोत्कृष्ट आहे त्याला अनुलक्षून जगण्याचा आपण कोणताही प्रयत्न सोडता कामा नये." (भा. शो. ६८५–८६).

नेहरूंचा खरा पिंड होता तो कार्यप्रवणतेचा– कर्मयोग्याचा. त्यांची प्रकृती प्रामुख्याने 'राजस' होती हे खरे; तथापि त्यांच्या कार्यप्रवणतेला चिंतनाची व विचारशीलतेचीही जोड होती. बाहेरील जगात हिंडत फिरत असताना ते सदैव कार्यमग्न असत. त्यात शांतपणे व निर्विकार चित्ताने विचार व चिंतन करावयास त्यांना क्वचितच शांतता व फुरसद मिळे. विश्रांति ही तर त्यांना जीवनाच्या अंतापर्यंत माहीत नव्हती. त्यांना स्वतःचे वैयक्तिक असे जीवन उरलेच नव्हते. ते समाज, सरकार व जागतिक परिस्थिती यांच्या प्रश्नांमध्ये इतके समरस होऊन गेले होते की त्यांना खाजगी व वैयक्तिक असे काही उरलेच नव्हते. त्यांचे जीवन जणु समाजमय व राष्ट्रमय बनून राहिले होते. त्यांना थोडी विश्रांति, शांतता, स्वास्थ्य व चिंतनास अवधि काय मिळत असे तो फक्त कारावासातच. कारावासात ते कल्पनेने मागील असंख्य स्मृती चाळवून व तपासून पाहात व आपल्या सर्व विचारांचे व कृतींचे आदर्शाच्या दृष्टिकोनातून मूल्यमापन करून स्वतःच्या वागण्याचे इष्टानिष्टत्व ठरवीत.

नेहरूंच्या ठिकाणी कमालीची कार्यप्रवणता असूनही ते कामाच्या प्रचंड लोंढ्यात कधी वाहवत गेले नाहीत.








कामांच्या महासागराच्या प्रचंड लाटात व आंदोलनात त्यांचे डोके नेहमीच पाण्याबाहेर ते ठेवू शकत असत. त्यांनी कार्याचा, कर्मशीलतेचा अतिरेक कधी होऊ दिला नाही. कार्याच्या अति उत्साहाच्या भरातही त्यांनी आपली विवेकबुद्धी सतत जागृत व तेजस्वी ठेवली होती. सत्ता व कार्य यामुळे त्यांचे डोके कधी भडकले नाही. उलट त्यांच्या कार्यावर त्यांच्या विवेक व सारासार बुद्धीचे संपूर्ण नियंत्रण असे. किंबहुना भावनातिरेकाने ज्यावेळी इतरांच्या भावना अत्यंत उद्दीपित होऊन लोकांच्या मनाचा संयम सुटण्याचे व तोल जाण्याचे प्रसंग येत त्यावेळी हा महापुरुष भावनाप्रधान असूनही आपल्या भावनावर कडक नियंत्रण ठेवून, डोके शांत व समतोल ठेवून पराकोटीच्या विवेकाची भाषा बोलत असे व लोकसभेतून भावनातिरेकतेपायी आपल्या देशबांधवांकडून भलता आचार होऊन त्यामुळे देशास खाली मान घालण्याचा प्रसंग येऊ नये म्हणून धोक्याचा व सावधगिरीचा इशारा देई, सावधतेची घंटा वाजवी. नेहरूंची शांतमनस्कता, आत्मसंयम, विवेकप्रवणता व उच्च जीवनमूल्यांवरील अविचलित निष्ठा कसोटीच्या प्रसंगी उत्तम रीतीने व्यक्त होई. अहमदनरच्या किल्ल्यातून १९४४ साली त्यांनी 'भारताचा शोध' या आपल्या ग्रंथात आपल्या मनाच्या अवस्थेचे प्रांजलपणे रेखाटलेले चित्र अत्यंत हृदयंगम व रसपूर्ण असे आहे. ते म्हणतात "गेल्या बारा वर्षात मी बराच बदललो आहे. मी अधिक चिंतनात्मक प्रवृत्तीचा बनलो आहे. कदाचित् माझ्या ठिकाणी काहीशी अधिक समतोलता व संतुलन आलेले आहे. माझ्या ठिकाणी मनाची शांतता आता वाढली आहे. पूर्वी कष्टप्रद घटनांचा मजवर जितका तीव्र परिणाम होऊन माझे चित्त विचलित होत असे तितका मोठा परिणाम दुःखद घटनांनी माझ्यावर होऊन माझे मन आता विकारांनी त्रस्त होत नाही. आता मला होणारा मनस्ताप, संक्षोभ, भावनांची उद्वेगता व मनाच्या घालमेली पहिल्यापेक्षा कमी होतात व ज्या होतात त्या अल्पकालीन ठरतात. पूर्वीपेक्षा घटना अधिक कष्टप्रद असल्या तरी त्यामुळे माझ्या मनाला पहिल्यापेक्षा कमी व्यथा होते. मला आश्चर्य वाटते हे असे कशामुळे होते आहे? माझ्या ठिकाणी औदासीन्याची भावना का बळावली आहे? का माझे मन आता अधिक बोथट व कमी संवेदनशील बनले आहे? का हा वाढत्या वयाचा परिणाम आहे? का माझी जीवनशक्ती व जीवनाविषयींची आसक्ती मंदावू लागली आहे? का तुरुंगात दीर्घकाल राहिल्यामुळे जीवनाला ओहोटी सुरू झालेली आहे? का काही काळ मनात नांदणारे विचार ओसरून त्याचे मंदावलेले तरंग मागे राहिलेले आहेत? संत्रस्त व पीडलेले मन हे त्यातून सुटण्यासाठी व स्वतःस वाचविण्यासाठी काही मार्ग शोधत असते. एकामागून एक धक्के बसत गेले म्हणजे ज्ञानेंद्रिये बधिर होतात व मग माणसाचे मन अशा भावनेने भरून जाते की इतके अशुभ व इतक्या विपत्ती यांनी जग झाकाळून टाकलेले आहे की त्यात आणखी थोडयांची भर पडली व त्यातील काही थोडया कमी झाल्या तर जगाच्या एकूण स्वरूपात काही फारसा फरक पडत नाही. शेवटी आपल्याजवळ उरते ते काय? फक्त एकच गोष्ट उरते व ती कोणास काढून घेता येत नाही; व ती म्हणजे धैर्याने, मानाने व प्रतिष्ठेने जगणे, आणि ज्या आदर्शांनी व ध्येयांनी आपल्या जीवनाला अर्थ प्राप्त करून दिलेला असतो त्यांना चिकटून राहणे. परंतु हा राजकारणी लोकांचा मार्ग नव्हे.

नुकतेच कोणी म्हणाले की "मरणे हा प्रत्येक जन्मलेल्याचा जन्मसिद्ध हक्क आहे." स्पष्ट गोष्ट मांडण्याची ही एक गमतीदार पद्धति आहे. मरणे हा असा जन्मसिद्ध हक्क आहे की जो कोणी आतापर्यंत नाकारलेला नाही किंवा नाकारणेही शक्य नाही. आणि आपणास जमेल तोपर्यंत आपण मरण विसरण्याचा किंवा टाळण्याचा प्रयत्न करीत असतो. आणि तरीही हे मांडण्याच्या पद्धतीत काही नाविन्य व आकर्षकता आहे. जे जीवनाविषयी फार कुरकूर व तक्रार करतात त्यांना हवे असल्यास त्यातून सुटण्याचा नेहमीच एक मार्ग मोकळा असतो. तो मिळविणे हे नेहमीच आपल्या हातात असते. जर आपणास जीवनाचे स्वामी बनता येत नसेल तर निदान मृत्यूचे तरी स्वामी बनता येणे शक्य आहे. आपल्या असहायतेची जाणीव कमी करणारा असा हा मृत्यूचा सुखद विचार होय." (भा. शो. १२)

अशारीतीने पंडितजींचे विचार वाचत असताना ते किती चिंतनशील प्रकृतीचे होते, ते जीवनासंबंधी










मूलभूत व अंतिम विचार कितीदा व किती वेगवेगळ्या रीतींनी करीत असत व अशा तऱ्हेच्या विचारात किती रंगून व गढून जात व तसे करण्यात ते स्वतःचे भान व अस्तित्व कसे विसरून जात हे पाहण्यासारखे आहे. वरील सर्व उताऱ्यात नेहरूंची खोल तत्त्वचिंतनाची प्रवृत्ती स्पष्ट दिसून येते. जन्म, मृत्यु, सुख, दुःख, पुनर्जन्म, मनःशांती याविषयी त्यांनी कितीतरी विविध रीतींनी चिंतन केलेले आहे. ह्याचे मनोज्ञ व हृद्य वर्णन त्यांच्या लिखाणात अनेक ठिकाणी पाहावयास सापडते. नेहरू हे व्यावसायिक पद्धतीचे राजकारणी नव्हते. त्यांनी वर म्हटलेच आहे की " असा विचार करणे हा राजकारणी माणसांचा मार्गच नव्हे." नेहरूंची प्रकृती ही चिंतकाची व तत्त्वज्ञान्याची होती, व तिला कार्यप्रवणतेची जोड होती. किंवा कर्मप्रवणता हा त्यांचा स्थायीभाव होता व कार्य करण्यासाठी व करीत असताना त्यांना वेळोवेळी जे सुचले, स्मरले, वाटले व अनुभवायला मिळाले ते त्यांनी मनमोकळेपणाने शब्दांकित केलेले आहे. त्यांच्या लिहिण्यात त्यांचे मन, त्यांच्या मनातील तुंबळ भावनांची वादळे, संघर्ष, संदेह, दोलायमानता ही सर्व स्फटिकासारखे स्वच्छपणे व्यक्त झालेले आहे. त्यांचे लिखाण प्रांजल, प्रामाणिक, आत्मलक्षी व सहज वाटते. त्यांच्या लिखाणात कृत्रिमता नाही; आपला बडेजाव, आपला मोठेपणा, विद्वत्ता, मुत्सद्दीपणा व श्रेष्ठत्व दाखविण्यासाठी काही मुद्दाम प्रयत्न केलेले आहेत असे कोठेही दिसत नाही. जे आहे ते शुद्ध अनुभवाचे प्रांजल व खडे बोल. स्वतःच्या अनुभवांचे साध्या, सरळ पण मनोरम शब्दात केलेले शब्दांकन व ते प्रांजल असल्यामुळे व स्वतःच्या अनुभवांचे जिवंत चित्रण असल्यामुळे वाचणाऱ्याच्या अंतःकरणाचा ठाव व पकड घेते, हृदयाला सरळ जाऊन भिडते.

---














चंद्रकांत बांदिवडेकर

# गांधीवाद आणि मराठी कादंबरी

गांधीवाद अशी काही चीज अस्तित्वात आहे किंवा नाही या विषयी जरी मतभेद असले आणि खुद्द गांधीजींनी 'माझा असा वेगळा वाद नाही' असे आवर्जून सांगितले असले तरीही जीवनविषयक एक आगळा, संपूर्ण आणि महत्त्वाचा असा जीवन-दृष्टिकोण म्हणून गांधीवादाला भारतात प्रतिष्ठा मिळाली. भारतीय जनता काही काळ या दृष्टिकोणाने आकर्षित झाली होतीच पण काही पाश्चात्य तत्त्वज्ञान्यांनाही याचे आकर्षण वाटले होते, ही गोष्ट नाकारण्यासारखी नाही. गांधीवादाचा राजकीय क्षेत्रातला एके काळचा प्रभाव वादातीत आहेच पण त्या वारशावर आजही काही राज्यकर्ते हक्क सांगतात. या विचारसरणीचा महाराष्ट्रात कितपत व कसा प्रभाव पडला हा प्रश्न अनेक दृष्टींनी महत्त्वाचा आहे. राजकीय क्षेत्रात शुद्ध गांधीवादी समजली जाणारी मंडळी (शंकरराव देव, आप्पासाहेब पटवर्धन वगैरे) स्वातंत्र्योत्तर काळात आपल्या मर्यादांमुळे म्हणा किंवा राजकीय क्षेत्रात गांधीवाद महाराष्ट्रात फारसा रुजला नाही म्हणून म्हणा फिकी पडत चालली. गांधीवादाकडे अतिशय श्रद्धेने आणि बौद्धिक विवेकशील दृष्टीने पहाणाऱ्या आचार्य जावडेकरांना त्याचा समन्वय समाजवादाशी करण्याची आवश्यकता भासली. आचार्य भागवतांनाही 'आध्यात्मिक' शब्दाचा अर्थ ताणून पाश्चात्य विज्ञानाच्या विकासाच्या पाठीशी ही आध्यात्मिक प्रेरणा आहे असेच सांगावे लागले. महाराष्ट्रात व संपूर्ण भारतात गांधीवादाचा खरा वारस विनोबा. पण त्यांनाही विज्ञानाच्या अस्तित्वाची, विकासाची व जीवनात असलेल्या उपयुक्ततेची जाणीव सतत बाळगावी लागली. एवढेच नव्हे तर गांधीवादाची बौद्धिक किंवा तार्किक दृष्टीने मांडणी करून विज्ञान व आत्मज्ञान यांची समर्पक सांगड घालण्याची आवश्यकता आता आली आहे असे सांगावे लागले. वैचारिक क्षेत्रात गांधीवादाची तर्कशुद्ध मांडणी करण्याचा प्रयत्न दादा धर्माधिकारी यांनीही केला आहे. विनोबा व दादा धर्माधिकारी यांच्या लेखनाकडे जावे तेवढे लक्ष तरुण पिढीचे गेले नाही ही अत्यंत खेदाची गोष्ट आहे. या चिंतकांनी गांधीवादाचे तत्त्वज्ञान व्यवहारात कसे आणता येईल, विशेषतः स्वातंत्र्योत्तर काळांत ते कसे उपयोगी पडेल याचा नेटाने विचार केला आहे. तात्पर्य गांधीवादाला महाराष्ट्रात अशा तऱ्हेने व्यवहाराची व तार्किकतेची जोड मिळत राहिली आहे आणि वैचारिक क्षेत्रात अजूनही या संदर्भात मंथन चालू आहे.

गांधीवादाचा प्रभाव वैचारिक व राजकीय क्षेत्रांप्रमाणे मराठी साहित्यावरही पडलेला दिसून येतो. हा प्रभाव कादंबरी वाङ्मयप्रकारावर विशेष प्रकर्षाने पडलेला जाणवतो. कादंबरी हा वाङ्मयप्रकारच इतका लवचिक आहे की सौंदर्यमूल्ये आणि जीवनमूल्ये, कलाशुद्धता आणि प्रचार, विचार आणि भावना, गद्य आणि काव्य यांचा संगम या वाङ्मयप्रकारात मोठ्या प्रमाणावर आढळतो. आज केवळ शुद्ध साहित्यावर किंवा कलामूल्यांवर भर देऊन सौंदर्यलक्षी किंवा प्रभाववादी (Impressionistic) टीका करण्याकडे प्रवृत्ती अधिक आहे. आणि त्यामुळे एखाद्या जीवनदृष्टिकोणाचा साहित्यप्रकारावर पडलेला प्रभाव दाखविणे किंवा त्याचा विचार करणे कदाचित् जुनाटपणाचे किंवा अधिक भारदस्तपणे सांगायचे तर संशोधनपर किंवा Academic मानले जाईल. पण मराठी कादंबरी व गांधीवाद यांच्या अन्योन्य संबंधाचा विचार अनेक दृष्टींनी मनोरंजक व बोधपूर्ण होण्याची शक्यता आहे. गांधीवाद महाराष्ट्रात रुजला होता का? कितपत? अतिशय संवेदनशील समजला जाणारा साहित्यक (जो द्रष्टा मानला जातो) या जीवनदृष्टिकोणाबद्दल किती जागरूक होता? त्याचा स्वीकार त्याने आस्थेने, जीवनाच्या भोवऱ्यात अनिवार्यपणे केला की तटस्थ विचारकाच्या भूमिकेवरून केला? राजकीय विचारांच्या लाटांचे पाणी अंगावरून जाऊ देण्या इतपतच त्याने












या जीवनदृष्टिकोणाचा स्पर्श स्वीकारला की या जीवनलहरींना सन्मुख होऊन आपल्या बौद्धिक भावनात्मक व चिंतनात्मक (एकंदर व्यक्तित्वाची) वृत्तींची त्याने नवी संघटना केली ? महाराष्ट्रात श्रद्धा नाही असे म्हटले जाते, ते खरे का ? त्याची कारणे कोणती ? टिळकांच्या व्यवहारवादी राजकारणाचा प्रभाव या पाठीमागे कितपत होता ? आगरकरांचा तर्ककर्कश बुद्धिवाद कितपत होता ? की केळकर– फडके प्रभृतींची सुखवादी प्रवृत्ती पाठीमागे होती ? या प्रश्नांची उत्तरे या चर्चेत मिळायला हरकत नाही. महाराष्ट्राच्या काही वृत्तीविशेषांवर, साहित्यिक परंपरांवर आणि मराठी लेखकांच्या मनावरही काही प्रकाश पडण्याची शक्यता आहे. गांधीवादी दृष्टिकोण साहित्याच्या विकासालाच मारक किंवा पोषक होता किंवा काय या प्रश्नाचेही उत्तर सापडू शकेल. एखाद्या दृष्टिकोणाचा चष्मा लावल्यास साहित्य उंचावते की स्खलित होते असेही या संदर्भात विचारता येईल.

या चर्चेपूर्वी एका गोष्टीचा खुलासा करायला हवा. मराठी कादंबरी व गांधीवाद या संबंधी एकच लेख प्रस्तुत लेखकाच्या वाचनात आला आहे. वा. ल. कुलकर्णी यांनी 'सत्यकथा' १९६१ च्या जुलै अंकात या विषयावर थोडेसे चिंतन केलेले आहे. प्रस्तुत लेखकाच्या प्रयत्नांची आवश्यकता तो लेख वाचल्यास जिज्ञासूंना कळेल. याविषयी अधिक लिहिणे युक्त नाही.

गांधीवादाचा बराच मोठा वैचारिक प्रभाव पडला तो वा. म. जोशी यांच्या मनावर. ते शुद्ध साहित्याचे समर्थक नव्हते व सामाजिक आशय कादंबऱ्यातून आल्यास त्यांना तो वावडा नव्हता. कलामूल्यांची बूज राखूनही केतकरांच्या कादंबऱ्यांचे आशयनिष्ठ किंवा विचारप्रधान म्हणूनच स्वागत व समर्थन करणारे ते पहिले टीकाकार होते. शिवाय राजकीय चळवळीत उडी घेऊन तुरुंगवासही भोगणारे ते कृतीवीर लेखक होते. 'सुशीलेचा देव' या कादंबरीत 'विश्वकुटुंबवाद' या नावाखाली त्यांनी समाजवादाचा पुरस्कार केला होता. पण यामुळे व्यक्तीचा विकास अवरुद्ध होण्याची शक्यता आहे, असे त्यांनी त्या कादंबरीतच म्हणून ठेवले आहे. या भयामुळेच की काय ते पुन्हा आपल्या गतिशील चिंतनप्रवृत्तीला चालना देतात आणि 'इंदू काळे व सरला भोळे' या कादंबरीत गांधीवादाची परीक्षा करण्याचा प्रयत्न करतात. व्यक्तित्वाविषयीचा त्यांचा आदर पहाता वरील भयामुळेच ते समाजवादी विचारांच्या भोवऱ्यापासून पाठ फिरवतात असे वाटते. 'इंदू काळे व सरला भोळे' या कादंबरीतले विनायकरावांचे व्यक्तिचित्र या दृष्टीने अभ्यसनीय आहे. ते मध्यमवर्गातले आहेत (वामनरावांची सर्व पात्रे खाऊन पिऊन सुखी अशा वर्गातली होती). ते प्राध्यापक होते व जीवन हसत खेळत कंठावे अशा समाधानी वृत्तीचे होते. त्यांनी आंतर्जातीय विवाह केला होता (या कादंबरीत या विवाहामुळे फारसा ताण येत नाही हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.) दोन वर्षांनी ते गांधींच्या प्रभावाने चळवळीत भाग घेऊन जेलमध्ये जातात. त्यांची संपूर्ण श्रद्धा गांधीवादावर नाही. आपण थोडेसे गांधीवादी झालो आहोत, असे ते म्हणतात. एका खेड्यात ग्रामोद्धाराच्या आकांक्षेने जाऊन रहातात. अडीच आण्याचे व्हाउचर नाही म्हणून गांधीवादी कार्यकर्ता त्यांचा अपमान करतो ! (गांधीवाद्यांच्या कर्मठपणावर व नियमाचे काटेकोर पालन करण्याच्या हव्यासामुळे माणुसकीचा आत्माच गमवण्याच्या कार्यपद्धतीवर हा चिमटा घेतलेला आहे.) विनायकरावांना खूपच मनस्ताप होतो. ते म्हणतात, "व्हाउचर नसणे ही चूक आहे आणि अडीच आणे मी भरणेही प्राप्त होते; पण माझी पूर्वपरंपरा, माझे अलिकडील वर्तन, चळवळीत पडण्यातील माझे हेतु, माझा दर्जा वगैरे पाहून तरी या गृहस्थाने भलतेसलते बोलावयास नको होते ... एवढे मात्र मनात येते की देशप्रेमामुळे द्रव्यहानि झालीच, संसारसुख संपले, ज्ञानलालसा पोटातच जिरली आणि आता यःकश्चित् चुकीमुळे नावही बद्दू होण्याची वेळ आली आहे !" (एकूण हिशेबतपासनीस व विनायकराव दोघांची व्यक्तित्वे गांधीवादाच्या प्रभावाने तपःपूत व क्षमाशील झालेली नाहीत ! जेलमध्ये चोरून आणलेली मिठाई विनायकराव खातात पण दुसऱ्यांदा आणू नको असे बजावितात. आणि याचे कारण आत्मिक क्लेश वगैरे नसून 'कोणी पकडले तर स्वतःलाच नव्हे तर बाहेरच्या मित्रांना शिक्षा होईल' असे आहे. पाचबावडी गावात आपल्या वैद्यकीय ज्ञानाबद्दलचे 'सत्य'










सांगण्याचा प्रांजलपणा ते करीत नाहीत; कारण मिळणाऱ्या प्रतिष्ठेचा त्याग त्यांना करवत नाही. गावात कार्य करताना परंपरावाद्यांकडून येणाऱ्या अडथळ्याबद्दल त्यांचा विचार पुष्कळदा तत्त्वापेक्षा व्यवहाराच्या भूमिकेवरून होतो. विनायकराव म्हणतात "माझ्यापुढे असा प्रश्न उभा राहतो की समाजाला चुचकारून थोडेसेच कार्य का होईना, पण सगळ्यांना बरोबर घेऊन करावे, का लबाड पण भेकड लोकांना न भिता तत्त्वनिष्ठेने सुचवलेली मोठी कार्ये करण्यास लागून आपत्तींना व धोक्यांना धैर्याने तोंड द्यावे! धैर्याने तोंड देण्यात मी भितो असे नाही, पण मोठा घास घेऊ लागल्याने कार्यविनाश तर व्हायचा नाहींना अशी भीति वाटते!" व्यवहार व तत्त्वनिष्ठा यांच्या संघर्षात प्रतिबिंबित झालेले वरचे वैचारिक ताण लक्षात घेतले तर महाराष्ट्रीय युवकाच्या मनातील टिळकांची लोकसंग्रही व्यावहारिक वृत्ती व गांधींची तात्त्विक तडजोड नाकारण्याची निर्भय वृत्ती यांच्या रस्सीखेचीचा खेळ लक्षात येईल. कधी ही शंका चाटून जाते ही मध्यमवर्गीय सुखवादी वृत्तीच तर नव्हेना? पण विनायकराव हरिजन चिंगीला आपल्या घरात ठेवतात, समाजातून बहिष्कृत होतात, शुद्ध पाण्याच्या अभावामुळे त्यांची दोन्ही मुले पटकीने मरतात. मधून मधून गांधीमार्गावरची त्यांची श्रद्धाही विचलित होते. केळकरांच्या कौंसिल प्रवेशाविषयी ते एका स्वयंसेवकाजवळ स्पष्ट म्हणतात "माझी बुद्धी तुमच्या बाजूला आहे, पण भावना गांधींकडे मला ओढते त्याला मी काय करू?"–शेवटी गांधींच्या अतिरेकी मार्गापेक्षा समन्वयवादी मध्यममार्गच त्यांना अधिक उचित वाटतो. "अशा स्थितीत ज्याने त्याने आपापल्या शरीरप्रकृतीला मानवेल, मनःप्रकृतीला आवडेल, आर्थिक परिस्थितीला जुळेल, भावनांना रुचेल, मताला पटेल, असा एखादा मार्ग स्वीकारावा आणि तोच आपला स्वधर्म म्हणून त्यात रममाण व्हावे."

महाराष्ट्रातल्या युवकांनी गांधीवादाचा पुरस्कार वैचारिक समाधानामुळे आणि तात्त्विक आस्थेने केला असे नव्हे, स्वातंत्र्य चळवळीच्या उत्साहात इतर जोरदार मार्गांच्या अभावी तो त्यांना करावा लागला, असे 'इंदू काळे व सरला भोळे' कादंबरी सांगते. यानंतर जोशी यांनी कादंबरी लिहिली नाही. समाजवाद व गांधीवाद दोन्ही मार्गांची अव्यवहार्यता किंवा अपूर्णपणा जाणवल्यामुळे तर ही समाजचिंतकाची लेखणी मूक झाली नसेल? त्यांना पुढचा मार्ग नीटसा आकळला नव्हता काय?

गांधींच्या तत्त्वज्ञानावर मराठी कादंबरीकारांची फारशी निष्ठा आढळत नाही. गांधींच्या रचनात्मक कार्यक्रमाचा पुरस्कार ही राष्ट्रीय शिस्त म्हणूनच केला. गांधीवादी कार्यक्रमाच्या स्वीकारापोटी गांधीवादापेक्षा गांधींच्या व्यक्तिमत्त्वाची मोहिनी अधिक दिसते. इतर विश्वासार्ह मार्गांच्या अभावी क्रियाशील तरुणांनी गांधीवादी मार्ग स्वीकारला. त्यांच्या भावनात्मक व वैचारिक अस्थिरपणाची प्रचीति कादंबऱ्यात येते.

या संदर्भात वरेरकरांच्या काही कादंबऱ्यांचा अभ्यास अधिक प्रकाश टाकणारा आढळून येईल. 'फाटकी वाकळ' व 'मी–राम जोशी' या दोन्ही कादंबऱ्यांचा नायक कथानिवेदक आहे. बी. ए. झाल्यावर हा निमगाव येथे जाऊन लोकसेवा व ग्रामोद्धार करू इच्छितो. नायक तरूण आहे व सहाजिकपणे त्याची वृत्ति थोडीफार रोमँटिक असायचीच. कादंबरीकाराच्या कृपेने त्याच गावची कमल नावाची एक मुलगीही नायकाबरोबरच बी. ए. झालेली असते. अर्थात गांधीवादाच्या शुष्क कार्यक्रमाबरोबर कथानायक व कमल यांच्या तारुण्यसुलभ प्रेमाकर्षणाची गोड गोळीही कादंबरीकाराने दिलेलीच आहे (जीवनवादाची व व्यवहारवादाची पताका फडकवणारे वरेरकर तत्कालीन मराठी कादंबरीच्या कृतक रोमँटिक परंपरांना फारच जपतात असे 'धावता धोटा' पासून सर्वच कादंबऱ्यांबद्दल म्हणता येईल.) ग्रामीण जीवनाची कटुता या नायकाला जाणवत नाही कारण कमल आहेच. शिवाय एका कुणबी जातीच्या बुद्धिमान कन्येचा (जन्मरहस्यही आहे!) जनीचा मधुर सहवासही त्याला लाभलेला आहे (तिला शिक्षण देण्याचे व तिचा उद्धार करण्याचे श्रेयही नायकाला मिळतेच). एकंदर कादंबरीत कमल व जनी आणि कथानायक यांच्या तरल संबंधांचा त्रिकोणच प्रभावी झालेला आहे. कादंबरीच्या शेवटी नायक हताशपणे म्हणतो की मी खेड्यात आलो खरा पण अजूनही वास्तवाचा खरा बोध मला झालेला नाही. "अजून पुष्कळ गोष्टी करा-








यच्या होत्या. किती तरी बेत आखून ठेवण्यात आले होते. आजूबाजूच्या शेतकऱ्यांच्या जीवनाकडे एकदा नजर फिरवून त्यांना कोणत्या कामाला लावता येईल हे ठरवायचे होते." (फाटकी वाकळ). अर्थात् हे शेतकऱ्यांच्या जीवनासंबंधी कार्य पुढेही (मी–राम जोशी) झाले नाही. इथेही नायक स्पष्ट म्हणतो,– "भीत भीत पाऊल टाकण्याच्या माझ्या वृत्तीमुळे बरीचशी कामे मागे पडली होती. धार्मिक समजुतीवर आघात करणे, अस्पृश्यता निवारण करणे, परस्परातील तंटे भांडणे मिटवायचा जोराचा प्रयत्न करणे वगैरे सुधारणा जरूरीच्या आहेत असे वाटत असून सुद्धा त्यांना हात घालायला मी भीत होतो." या कादंबऱ्यात खादीप्रचार, हातमागावर सूत तयार करण्याचे शिक्षण, श्रमदान, सफाई, माफक प्रमाणावर अस्पृश्योद्धार वगैरे कार्यक्रम आहेत; पण नायकामध्ये गांधीवादी तत्त्वज्ञानातून येणारा तल्लीनपणा कुठेच आढळत नाही. या कादंबऱ्या वाचताना वाटत राहाते वरेरकरांना तत्कालीन गांधीवादी कार्यकर्त्यांवर मिस्किलपणे भाष्य तर करायचे नव्हते? एकंदर कादंबरीचा रोख व विशेषतः व्यक्तित्त्वांचा रोख पाहता असे वाटत नाही. मग महाराष्ट्रातील गांधीवादी तत्त्वज्ञानाचा किंवा कार्यक्रमाचा स्वीकार करणाऱ्या तरुणांबद्दलचे सत्यच अभावितपणे प्रकट झाले काय? तसे असेल तर त्या गांधींच्या सखोल आणि जीवनाचा ठाव घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या (मग हा प्रयत्न यशस्वी होवो किंवा फसो) गांधी-मार्गाचा आपण किती वरवरचा (superficial) विचार करीत होतो हेच खरे. हा नायक गांधीवादी तत्त्वांप्रमाणे साधनांच्या पवित्रपणाचा आग्रह धरीत नाही. नायक व नायिका दोघेही व्यावहारीक (एक विसंगति– गांधीवादीही व्यावहारिक जीवनाचा विचार करतात. म्हणजे हा 'व्यावहारिक' शब्द 'जमेल व पचेल' तेवढा या अर्थाने घ्यावा लागतो) आहेत, असाही विचार येतो– गांधीवादी मार्गाला व्यावहारिक रूप देण्याचा प्रयत्न (टिळक पद्धतीचा प्रभाव?) तर वरेरकर करीत नसतील? पांढरपेशा समाजाला लाखोली वाहून सुद्धा वरेरकरांची पात्रे पांढरपेशीच राहातात व खालच्या समाजातली पांढरपेशी बनू पाहातात– या कादंबरीतली 'जनी' याचे ढळढळीत उदाहरण आहे.

या पार्श्वभूमीवर एकंदर वरेरकरांची कादंबरीही वास्तवाच्या खडबडीत जमिनीवर न राहाता कृत्रिम वाङ्मयीन परंपरांशी हातमिळवणी करूनच जात असते असे आढळून येते.

गांधीवादाचा अधिक जाणीवपूर्वक प्रभाव घेऊन आलेले तिसरे मोठे लेखक म्हणजे वि. स. खांडेकर. वा. ल. कुलकर्णी खांडेकरांबद्दल लिहितात– खांडेकरांच्या कांचनमृगापासून ययाति पर्यंत कथा-साहित्यावरचा गांधीवादाचा प्रभाव कुणा आंधळ्यालाही दिसून येईल. खांडेकरांची प्रकृति साने गुरुजींप्रमाणेच गांधीवादाला अनुकूल आहे. खांडेकर त्याग, पराक्रम, आदर्श आणि मानवता यांचे पूजक आहेत. या स्वप्नांचे रेखन त्यांच्या प्रतिभेने प्रेमाने केलेले आहे; तेव्हां त्यांच्या प्रतिभेने अंकित देशभक्त वीरांगना, समाजशिक्षक आणि सत्याग्रहींच्या चित्रणात मुख्यता गांधीवादी रंग येणे स्वाभाविकच आहे. (मूळ 'सत्यकथा' जुलै १९६१ चा अंक जवळ नसल्यामुळे आशय बिनचूकपणे व्यक्त केला आहे.) खांडेकरांच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल लिहिलेले ठीक आहे. पण त्यांच्या सर्व कादंबऱ्यांवर गांधीवादी रंग आहे हे कुणीही डोळस माणूस मान्य करणार नाही. 'कांचन मृगा'-पासून 'दोन ध्रुवा'पर्यंत ते गांधीवादाने भारावलेले दिसतात. नायकाचे खेड्यात जाणे, तिथे जाऊन शिक्षणप्रचार करणे, कुण्या मिलमालकाच्या पुत्राने ग्रामोद्धारासाठी शाळेसाठी संपत्तिदान करणे इत्यादी गोष्टी 'कांचनमृग'मध्ये आल्या आहेत. अर्थप्रधान संस्कृतीच्या फलितावर प्रश्नचिह्न ठेवण्याचे पुसट कार्य खांडेकरांनी केलेले आहे. पुढे 'डब्का' कादंबरीत भाऊंचा ध्येयवाद सामाजिक विषमतेच्या चिखलात रुतून बसलेला दिसतो. 'कांचनमृगा'तला आशावादी सुधाकर पुढे 'उल्के' मध्ये भाऊंच्या रूपाने निराशावादी बनून येतो. याच कादंबरीत चंद्रकांत क्रांतीची मशाल घेऊन येतो. पुढे 'दोन ध्रुव' कादंबरीत समाजवाद व गांधीवाद यांचा संमिश्र, भांबावल्यासारखा प्रभाव आढळतो. खांडेकर द्विधा मनस्थितीत सापडलेले दिसतात. नायिका वत्सला मजुरांच्या जीवनाशी एकरूप होण्याचा प्रयत्न करते व पश्चात्तापदग्ध पतीलाही वाटेला लावते. दोन वर्गातले अंतर 'दोन ध्रुवा'इतके आहे याची जाणीव प्रकर्षाने तिला होते. पतीचे किंचित्










अनुक्रमणिका

हृदयपरिवर्तन झालेले असले तरी पत्नीचे झालेले नाही हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. व्यक्ती म्हणून हृदयपरिवर्तन शक्य असले तरी दोन वर्गांतील दरी किंवा अंतर अशा सोप्या मार्गाने कमी होणे कठिण आहे, याची जाणीव खांडेकरांनी करून दिलेली आहे. याच कादंबरीत एका उन्मत्त रेड्याला मारू नये असे अहिंसावादी बाप्पा म्हणतात. पण शेवटी त्याला मारावे लागते. अहिंसेच्या आत्यंतिकतेचे किंवा अव्यवहार्यतेचे प्रतीकात्मक प्रकटीकरण म्हणून हा प्रसंग ठीक आहे पण अन्यथा हास्यास्पद वाटतो. विद्याधर काजू फोडण्याच्या यंत्राचे नकाशे फाडून टाकतो व यंत्रामुळे बेकार होणाऱ्या मजुरांवरचे संकट आपल्या पुरते तरी टाळतो. हा मजुरांच्या बेकारीवरचा गांधीवादी उपाय आहे की कथा पूर्ण करण्यासाठी दिलेला आदर्शवादी वळसा आहे हे सांगणे कठीण आहे. पुढे क्रौंचवध मध्ये खांडेकर पुन्हा गांधीवादाकडे वळताना दिसतात. प्रस्तावनेत ते तशी कबूलीही देतात. या कादंबरीत ते भोगवादाला विरोध करतात ('जळलेला मोहर' कादंबरीचे वळण घेऊन). भगवंतरावाचे हृदयपरिवर्तन दाखवतात– एकंदरीत गांधीवादी प्रकृती असली तरी खांडेकरांना गांधींचा अतिरेकीपणा पसंत नसावा व ते तत्त्वज्ञान व्यवहाराच्या दृष्टीने सामान्य मनाला झेपणारे नसावे असे त्यांचे मत असावे. व्यक्तिगत गांधींबद्दल मात्र इतर कुणाही लेखकापेक्षा खांडेकरांना आदर अधिक आहे.

जोशी, वरेरकर, खांडेकर यांचे नायक 'खेड्याकडे चला' या गांधींच्या घोषणेला प्रतिसाद देऊन खेड्याकडे जातात पण ते मनाने शहरी राहातात एवढेच नव्हे तर शहरच खेड्यात घेऊन जातात असे भासते.

महाराष्ट्रात प्रेमा कंटक व सानेगुरुजी या साहित्यक्षेत्रात दुय्यम दर्जाच्या लेखकांनी मात्र गांधीवादाचा अतिशय श्रद्धेने आणि निष्ठेने स्वीकार केलेला आढळतो. पण महाराष्ट्राच्या वैचारिक परंपरांच्या पार्श्वभूमीवर या लेखकांच्या कादंबऱ्या सुद्धा विशुद्ध गांधीवादी राहात नाहीत.

प्रेमा कंटक यांच्या दोन्ही कादंबऱ्या ('काम आणि कामिनी' व 'अग्नियान') शुद्ध गांधीवादी बैठक घेऊनच लिहिण्याचा प्रयत्न केला गेला आहे. गांधीवादी नायक निर्माण करण्याचा आपला हेतु प्रस्तावनेत लेखिकेने सांगितलाच आहे. गांधीवादी नायकाला आवश्यक असे गुण भरण्याचा व तशी कौटुंबिक व पैतृक परंपराही निर्माण करण्याचा प्रयत्न केला आहे. ब्रह्मचर्यासंबंधी गांधींच्या विचारांवर विशेष जोर देण्याचा यत्न केला आहे. कथा, वातावरण, समस्या, उद्देश, पात्ररचना सर्व काही गांधीवादाला साजेसे आहे. सत्याची चाड बाळगून की काय आपला नायक ॲब्नॉर्मल झाला असल्याची स्पष्ट कबूलीही लेखिकेने दिली आहे. वस्तुतः मानसशास्त्रात ज्या तऱ्हेने व्यक्तीला 'ॲब्नॉर्मल' मानले जाते, तसा हा नायक असता तर कादंबरीला वेगळे परिमाण येऊन कादंबरीची गुणवत्ता उंचावली असती. पण हा नायक ॲब्नॉर्मल होतो म्हणजे गांधीवादी तत्त्वज्ञानाचा जीवनात किंवा व्यवहारात प्रयोग करू पहाणारा अतिशय निर्जीव व बावळट नायक होतो. वैवाहिक जीवनाचा अनुभव नसल्यामुळे त्या जीवनाचे चित्रण करण्याचा प्रयत्न फसण्याची शक्यता आहे असेही लेखिका म्हणते आणि तिचे हे मूल्यमापन प्रांजळपणाचे आहे व खरेही आहे. 'गाढव गेले आणि ब्रह्मचर्यही गेले' असा भास कादंबरी वाचतांना होतो.

त्या मानाने 'अग्नियान' अधिक यशस्वी वाटते. या कादंबरीत गांधींचा रचनात्मक कार्यक्रम आहे. दारुबंदी किंवा स्वदेशी आंदोलनात महाराष्ट्रीयन स्त्री किती तेजस्वितेचा प्रत्यय देत होती, लाठीहल्ला सहन करीत होती, जेलमध्ये सानंद जात होती या गोष्टीचे प्रत्ययपूर्ण चित्रण केलेले आहे. पण कादंबरी वाचताना असा भास होतो की लेखिकेच्या मनात गांधीवादी तत्त्वज्ञानाबद्दल कुठेतरी संशय उत्पन्न झालेला आहे. ती विचलित झाली आहे. गांधीवादी नायकाला वाटणारी ईर्षा, आत्मशुद्धीखातर उपवास वगैरे गोष्टींचा वाचकाच्या मनावर विपरीत परिणाम होतो. विशेषतः ज्या तऱ्हेने कादंबरीचा शेवट केला आहे, त्यावरून लेखिकेची गांधीमार्गावरची निष्ठा विचलीत झाल्यासारखी वाटते. प्रेमा कंटक यांच्या निष्ठेबद्दल वस्तुतः शंका घेण्याचे कारण नाही– जीवनात गांधीमार्गाबद्दल त्या सश्रद्धच राहिल्या पण त्यांचे लेखक म्हणून जे व्यक्तित्व (writing self) या कादंबरीत प्रकट झाले आहे त्यात निश्चितपणे श्रद्धांचा किंवा विचारांचा गोंधळ झाला असावा असे वाटते. कदाचित् तर्काचे








काटे श्रद्धेच्या मखमली वस्त्रातूनही अन्तर्मनात खुपू लागले असावेत, कदाचित् कादंबरी लिहिताना साकार होत असलेल्या पात्रांच्या चैतन्याने त्यांच्या गांधीवादी दृष्टिकोणाशी दोन हात केले असावेत– गांधीवादी नायकाचा उपवास, त्याची आत्मशुद्धी ही गांधीवादी श्रद्धेतून निर्माण न होता, मानसिक गंडातून उत्पन्न झाल्यासारखी वाटतात.

सानेगुरुजींचे व्यक्तिमत्व मात्र खऱ्या अर्थाने गांधीवादाला अनुकुल होते असे वाटते. आस्तिकता, आदर्शवादाची दुर्दम्य ओढ, सेवाभावाचे अतिशय आकर्षण, त्यागाची तत्परता, बुद्धिवादाबद्दल शंका किंवा अनास्था, आत्मिक आवेश, मनुष्याबद्दल व इतर प्राणीसृष्टीबद्दल सहज प्रेमभाव इत्यादी गुण साने गुरुजींच्या व्यक्तित्वात इतर कोणत्याही लेखकापेक्षा अधिक प्रमाणावर आढळतात. कलाकारांना आवश्यक तटस्थता मात्र साने गुरुजींजवळ नव्हती. हृदयातल्या भावधारा ओसंडून टाकण्यासाठीच जणू ते आपली पात्रे निर्माण करतात. पण त्यांच्या या पवित्र भावधारेत सामान्य वाचक तर वाहून जातोच पण विचक्षण वाचकही ते सर्व कलात्मक नाही, सौंदर्यमूल्यांनी युक्त नाही असे स्वतःशी म्हणत म्हणत या पावनगंगेत स्नात होतो. कलात्मकतेपेक्षा उज्ज्वल व्यक्तित्वाचा प्रभाव पडतो तो असा. 'आस्तिक' कादंबरीला लिहिलेल्या प्रस्तावनेत वि. स. खांडेकरांनी अशाच अर्थाचे उद्गार काढले आहेत.

क्रांती, संध्या, रामाचा शेला, धडपडणारी मुले, श्याम व श्यामची आई या कादंबऱ्यांतून त्यांनी देशप्रेमाने प्रेरित झालेल्या कार्यतत्पर युवकांचे प्रभावशाली चित्रण केले आहे. मराठी स्त्री देशप्रेमासाठी किती त्याग करू शकते याचे चित्र या कादंबऱ्यांतून आढळते. साने गुरुजींची आंतरिक श्रद्धा गांधीवादावर होती. तरीही संध्या कादंबरीत भाईंच्या मनात गांधीवाद व मार्क्सवाद यांच्या संबंधी विचारमंथन दाखविले आहे. भाई गांधीवाद स्वीकारतात–– बौद्धिक दृष्टीने आश्वस्त होऊन नव्हे, ही त्यांच्या मूळ प्रवृत्तीचीच निवड होती. या कादंबरीत सत्याग्रही युवकाच्या त्यागमय जीवनाचे रसाळ कीर्तन आहे. 'रामाचा शेला' मध्ये दुष्ट आणि वेश्यागामी शेटजींचे हृदयपरिवर्तन दाखविले आहे. अतिशय भावुक ( Sentimental ) व अस्तिक वाचकच ही कादंबरी वाचू शकेल. साने गुरुजींची अमर कृती 'श्यामची आई' – हा ग्रंथ गांधीवादी व्यक्तित्वाच्या सुगंधाने दरवळून गेला आहे. या कृतीचा घाटच तिच्या आशयाला अत्यंत अनुकूल असल्यामुळे इतर कृतीत जाणवणारा कलामूल्यांचा दोष इथे जाणवत नाही. प्रत्यक्ष पुत्र आपल्या प्रियतम मातेबद्दलच्या आठवणी सांगतो आहे ! या तंत्रामुळे भावुकता, आवेग, दृष्टीचा सीमित एकांगीपणा, आत्यंतिक जिव्हाळा, सरळ धोपट कथाप्रणाली, वाणीचे कमालीचे मार्दव व एकेरीपणा इत्यादी साहित्यिकदोषात जमा होणारे विशेष या कृतीत कलात्मक गुणात परिणत झालेले वाटतात. यामुळेच आचार्य अत्रे यांनी प्रस्तावनेत केलेली प्रभाववादी टीका यथायोग्य वाटते. भारतीय संस्कृतीचा जो मूळ प्रवाह गांधी व साने गुरुजी यांच्यात वहात होता तोच 'श्यामच्या आई'त प्रवाहित झालेला आहे. खुद्द वडिलांना ठार मारण्यासाठी आलेल्या मारेकऱ्यांच्या हृदयात देखील साने गुरुजींना मानवतेचे उज्ज्वल दर्शन घडते ! साने गुरुजी जरी विचारांनी समाजवादाचा पुरस्कार करणारे होते तरी त्यांचा एकूण पिंड हा गांधीवादाचाच होता.

मराठी कादंबरीवर पडलेला गांधीवादाचा अनुकूल प्रभाव साकल्याने लक्षात घेता कादंबरी आणि स्मृतिचित्रे यांच्या मीलनरेषेवर उभी असलेली साने गुरुजींची एकमेव कृती 'शामची आई' हीच सर्वार्थाने गांधीवादी कृती वाटते. अर्थात् या सर्व कलाकृतीत तीच सर्वात श्रेष्ठ बनली आहे, असेही म्हणता येईल.

गांधीवादाला मराठी कादंबरीत विरोधही कमी सहन करावा लागला नाही. ज्या वेळी गांधींच्या व्यक्तित्वाच्या विलक्षण मोहिनीने भारतातील तरुण वर्ग राष्ट्रीय चळवळीकडे आकर्षिला जात होता त्याचवेळी गांधींच्या मार्गाविषयी असंतोषही तरुण वर्गात धुमसत होता. व्यावहारिक यशापयशाच्या कसोट्यावर कोणत्याही मूल्यांचे खरेखोटेपण ठरविण्याकडे मराठी लेखकांचा कल अधिक. गांधीवादी मार्गाची विशेषतः चळवळींची व एकंदर राजकारणाची अव्यवहार्यता दाखविण्यात प्रोफेसर फडके यांनी विशेष उत्साह दाख-








विला आहे. 'निरंजन' 'प्रवासी' 'उन्माद' 'समरभूमी' 'आशा' या कादंबऱ्यात गांधीवादी सत्याग्रहांचा, चळवळींचा आलेख आहे. पण फडक्यांच्या मते गांधींचे राजकारण वैयक्तिक लहरीवर अवलंबून आहे आणि त्यांचा हृदयपरिवर्तनाचा मार्ग अशक्य कोटीतला आहे. 'समरभूमी' मध्ये काँग्रेसच्या नीतीची सूत्रे भांडवलदारांच्या हाती आहेत असेही फडके यांनी दाखवून दिले आहे. 'उन्माद-' मध्ये साधनांच्या शुचितेचा आग्रह निरर्थक आहे असे फडके म्हणतात.

गांधीवादाचा आणि व्यक्तिशः गांधींचाही अत्यंत तीव्र स्वरूपाचा निषेध 'मुखवटे' व 'कांता' या दोन्ही कादंबऱ्यात 'माडखोलकरांनी' केला आहे. कधी ही टीका गांधींवर वैयक्तिक निंदेच्या स्वरूपाची झाली आहे ही कुसुमावती देशपांडे यांची तक्रार रास्त वाटते.

एकंदरीत महाराष्ट्रात गांधीवादाला फारसे स्थान मिळाले नाही असे म्हणतात त्यात तथ्यांश आहे. मराठी कादंबरीवर पडलेल्या गांधीवादाच्या प्रभावाचा विचार करता मराठी लेखकांनी गांधीवादाकडे नेहमीच शंकेच्या, संशयाच्या किंवा असमाधानाच्या दृष्टीने पाहिले आहे. गांधीवादी संपूर्ण जीवनाचा स्वातंत्र्यपूर्व काळात प्रभाव पडणे कठीण होते कारण राष्ट्रीय चळवळीत गांधीवादाची एक अहिंसक लढाऊ स्वरूपाची तेवढीच बाजू प्रकट होत होती आणि व्यवहारात तिला फारसे यश येत नव्हते. वा. म. जोशी, खांडेकर, वरेरकर, फडके सर्वांच्या कादंबऱ्यातून या विषयीची निराशा व्यक्त झालेली आहे. आत्मनिर्भर ग्रामीण समाजाची पुनर्रचना, शहर व खेडे यांचे परस्पर पूरक शोषणरहित हितप्रद संबंध, राज्यशक्ती व दंडशक्ती यांचा क्रमशः लोप, समता आणि बंधुभाव यावर आधारलेला समाज, आत्मिक स्वातंत्र्याच्या रक्षणासाठी तत्पर असा सत्याग्रही वर्ग, शारीरिक श्रमांची योग्य प्रतिष्ठा आणि संपूर्ण स्वदेशी, दारुबंदी इत्यादी गोष्टींनी युक्त असे आदर्श 'रामराज्य' गांधींना अभिप्रेत होते. स्वातंत्र्यानंतर या सर्व कल्पना जवळ जवळ हवेत विरून गेल्या. त्यामुळे गांधीवादाचा साहित्यात प्रभाव पडणे स्वातंत्र्योत्तर काळात अशक्यच होते. सारांश स्वातंत्र्यपूर्व काळातच मराठी कादंबरीवर गांधीवादाचा थोडाफार प्रभाव पडलेला आढळून येतो. मराठी कादंबरीकारांनी गांधीवादाच्या ठिकाणी संपूर्ण श्रद्धा कधीच अर्पण केली नाही. असहयोग, आंदोलन, बहिष्कार, स्वदेशीची चळवळ, अहिंसक सत्याग्रह, इत्यादी डोळ्यासमोर घडणाऱ्या गोष्टींचे चित्रण कादंबरीकारांनी केले. बहुदा सर्व लेखकांनी गांधीवाद अव्यवहार्य, अबौद्धिक आणि अतिरेकी म्हणून सोडून दिलेला दिसतो. शंकेचे, संशयाचे व तर्ककर्कशतेचे काटे प्रेमा कंटक व सानेगुरुजी यांनाही मधून मधून अस्वस्थ करीत होतेच. साने गुरुजीही शंकाकुल वृत्ती सारखी दाबून टाकण्याचा प्रयत्न करीत आहेत असाही भास होतो– 'सन्ध्या' कादंबरी या दृष्टीने वाचण्यासारखी आहे.

आगरकरांनी मराठी मनाला विश्लेषण करण्याची– तर्क करण्याची संवय लावली. टिळकांनी व्यवहाराच्या भूमीवरच राजकारणाची व समाजकारणाचीही बीजे रोवली. यामुळे श्रद्धेने मराठी मन गांधीवादाकडे पाहू शकले नाही आणि म्हणून गांधीवादाचा प्रभाव पडला नाही असे म्हणता येण्यासारखे आहे. पण वैचारिक क्षेत्रात गांधीवादाची परीक्षा करणारे विनोबा, दादा धर्माधिकारी यांच्या प्रयत्नांचा काटशहही वरील समर्थनाला जातो. गांधींच्या आदेशाप्रमाणे मराठी कादंबरीकार उघड्या डोळ्यांनी खेड्याकडे जाते– ग्रामीण जनतेच्या सुखदुःखाशी एकरूप होते तर ? तर कृतक रोमँटिक असलेली मराठी मध्यमवर्गाची प्रवृत्ती ( हिचा आढळ पेंडशांच्या 'लव्हाळी'पर्यंत होतो. ) कदाचित् वास्तवाच्या भयानक दर्शनाने स्तिमित झाली असती किंवा तिला नवी दिशा लाभली असती. गांधीवादाचा प्रभाव वरपांगीच राहिला याचे खरे आणि मुख्य कारण ही कृतक रोमँटिक साहित्यप्रवृत्ती. खांडेकरांच्या कादंबऱ्यांचे नायक होण्याचे भाग्य कधी हरिजनाला ( दोन मने ), तर कधी कुणब्याला ( हिरवा चांफा ) मिळाले पण त्यांच्या मनाचा खरा पीळ, त्यांची दुःखे, दुखावलेली अस्मिता, त्यांचे न्यूनगंड, त्यांची सामाजिक ससेहोलपट, मानसिक कुचंबणा यांचा चुकूनही उल्लेख कधी आला नाही. ( तो यायला 'बळी' कादंबरीपर्यंत वाट पहावी लागली ! ) गांधीवाद न मानवण्याचे खरे कारण








मराठी कादंबरीकारांची सुखवादी प्रवृत्ती· फडके या प्रवृत्तीचे उघड समर्थक गणले गेले असले तरी खांडेकर, वरेरकर व वा. म. जोशीही कमी अधिक प्रमाणात या प्रवृत्तीला शरण गेलेले आहेत· अन्यथा खेड्यात जावूनही तिथल्या परिस्थितीचा वस्तुनिष्ठपणे वेध घेण्याच्या ऐवजी प्रेम-त्रिकोणाचा चाळा करीत हे लेखक बसले नसते. ( या तिन्ही लेखकांच्या वैयक्तिक जीवनातील साधेपणा, शुचिता, समाजकळकळ व त्याग यांचे विषयी प्रस्तुत लेखकाचे मनात अतिशय आदर आहे पण त्यांचे वाङ्मयीन व्यक्तित्व तितके उंच होऊ शकले नाही असे खेदपूर्वक म्हणावे लागते. ) ही सुखवादी प्रवृत्ती स्वातंत्र्यपूर्णकाळात लेखकात होती ( अपवाद फक्त केतकर व काही अंशी हडप ) व त्यानंतरही आढळते· ( या प्रवृत्तीला काटशह देणारे कादंबरीकार ' रानमूल ' कर्ते जोशी, उद्धव शेळके, अजगरकर्ते खानोलकर, जयवंत दळवी, बॅरिस्टर घोपेश्वरकरकर्ते भाऊ पाध्ये, शरच्चंद्र मुक्तिबोध हे आहेत ) या प्रवृत्तीने कधी तंत्राचा हव्यास धरून, कधी गुळगुळीत ध्येयवादाचा स्वीकार करून तर कधी बुळबुळीत शुचितेचा आग्रह धरून जीवनाच्या भीषण वास्तवाशी पाठ फिरवलेली दिसते. गांधीवादाचे इतर परिणाम जरी बुद्धिवादी तर्कप्रिय किंवा व्यवहारी मनाला रुचले नाहीत, निदान गांधींच्या वास्तवाचा सामना करण्याच्या वीरवृत्तीचा जरी प्रभाव पडला असता तरी मराठी कादंबरी खूप उंचावली असती. पण इंग्रजी राजवटीत सापेक्षतः बरे दिवस भोगलेल्या मध्यमवर्गीय साहित्यिकांनी किंवा त्यांनी निर्मिलेल्या साहित्यिक परंपरांना छेद देण्यात असमर्थ ठरलेल्या इतर कादंबरीकारांनी ( वैयक्तिक जीवनात खांडेकर व वरेरकरांनी खूप हालअपेष्टा भोगल्या पण ते तत्कालीन कृतक् रोमँटिक प्रवृत्तीच्या फारसे बाहेर पडू शकले नाहीत ) जीवनवीर गांधींच्या निर्भय सत्यनिष्ठेचा किंवा वास्तवाला सामोरे जाण्याच्या प्रयोगशील प्रवृत्तीचा प्रत्यय कधी दिला नाही.

---










प्रा. सौ. चंद्रा दलाया, अनुवादक– सौ. अनुराधा आचार्य

# परकीय मदत

आपल्या देशाच्या अर्थव्यवस्थेवर निश्चयकारी परि- णाम घडवून आणणाऱ्या दोन अत्यंत महत्त्वाच्या गोष्टी कोणत्या हे पाहू गेल्यास उत्तर मिळते ते म्हणजे हवा- मान नि परकीय मदत. दोन्हीही गोष्टी जवळजवळ पूर्ण- पणे अतर्क्यच; पण मजा अशी की आपल्या आर्थिक योजनांचे यशापयश नि राष्ट्रीय धोरणाच्या भवितव्य- तेची सारी सूत्रे यांच्यावरच अवलंबून असतात. देशात केव्हाही बिकट परिस्थिती निर्माण होवो त्याचे खापर फोडले जाते यांच्याच माथी. भाववाढ असो, पुरवठ्यात झालेली तूट असो, नाहीतर औद्योगिक क्षेत्रातली आर्थिक मंदी असो, याच दोन गोष्टी कानफाट्या ठरा- वयाच्या, हा जसा काही अलिखित नियमच होऊन बसला आहे. बाकीची इतर कारणे बहुधा दुर्लक्षिली जातात. उदाहरणच द्यायचे झाले तर आपल्यापुढील अन्नसमस्येचेच पहाना. उपलब्ध पुरवठ्याच्या वाटपात सुधारणा घडवून आणून, किंवा काही ठराविक वस्तूंच्या किंमतींच्या बाबतीत जास्त सुसंबद्ध धोरण आखून हा प्रश्न थोडाफार तरी सोडविता येईल. पण या सर्व परिस्थितीबद्दल जबाबदार धरले जाते पावसाला नि त्यामुळे निर्माण झालेल्या उत्पादनातील तुटीला. विशेष म्हणजे हवामानातील कायमचे फेरबदल, त्यामुळे संभवणारे शेतकी उत्पादनातील चढउतार, आणि परकीय मदतीबाबतची अनिश्चितता या गोष्टी इतक्या गृहीत धरल्या जातात की त्यामुळे ही अनिश्चि- तता कमी करण्याचाही काही प्रयत्न केला जात नाही किंवा याबाबतीत दुसरेही काही उपाय योजले जात नाहीत, की ज्यायोगे या अनिश्चिततेमुळे निर्माण होणाऱ्या परिमाणांची तीव्रता थोडी तरी कमी होईल.

हवामानाची अनिश्चितता ही काही आजकालच निर्माण झालेली गोष्ट नव्हे. आपल्या देशातील शेतीला पुरातन कालापासून असलेला तो एक शाप आहे. आपल्या देशातील बहुतांश जमिनीला कालवे, पाटबंधारे, धरणे याद्वारा पाणीपुरवठ्याची सोय होईपर्यंत, आणि वारंवार ठराविक प्रदेशात येणाऱ्या पुरांना ताब्यात आणेपर्यंत ही अनिश्चितता जळूसारखी शेतकी व्यव- सायाला चिकटूनच रहाणार, नि त्याचबरोबर बाकीच्या अर्थव्यवस्थेवरही ती परिणाम करीत रहाणार. या अनिश्चिततेपायी उपजणाऱ्या चढउतारांवर एक उपाय म्हणजे इतर देशातून शेतकी उत्पादनाची आयात करणे; अर्थात यामुळे शेतकी उत्पन्नात होणाऱ्या फेरबदलात काहीच परिणाम होत नाही. हवामानातील अनिश्चिततेमुळे निर्माण होणाऱ्या परिस्थितीवर कायम स्वरूपाचा तोडगा शोधून काढणे हा नियोजनमंडळा- पुढला एक महत्त्वाचा प्रश्न आहे आणि त्यासाठी दूरगामी स्वरूपाच्या योजनांची आवश्यकता आहे. या लेखात प्रामुख्याने दुसऱ्या अनिच्छित बाबींचा म्हणजेच परकीय मदतीचा विचार करण्यात आलेला आहे.

परकीय मदतीत साधारणपणे इतर देशांनी भारताला देऊ केलेल्या साऱ्याच बाबींचा एकत्रितपणे समावेश होतो. खाली नमूद केलेल्या सर्व गोष्टींचा परकीय मदतीत अंतर्भाव करावा लागेल.

( १ ) शैक्षणिक किंवा इतर काही गोष्टींकरता केलेली मदत–याला आपण विशुद्ध मदत म्हणू.

( २ ) पी. एल्. ४८० या कलमान्वये केलेली आयात–याची परतफेड आपल्याला आपल्या राष्ट्रीय चलनात करावी लागते नि शिवाय वाहतुकीकरता नि इतर काही बाबींकरता झालेल्या खर्चाची परतफेड परकीय चलनात करावी लागते– ( सध्याच्या करारा- प्रमाणे या मदतीच्या ठराविक भागाची परतफेड डॉलर्स- मधून करावयाची आहे. )

( ३ ) भारत व इतर देशांमध्ये झालेल्या करारा- प्रमाणे आपल्याला मिळणारी देशोदेशींची कर्जवजा मदत.

( ४ ) कोलंबो योजनेद्वारा मिळणारे कर्ज नि मदत–

आय्. बी. आर. डी. ( I. B. R. D. ) नि आय्. डी. ए. ( I. D. A. ) यासारख्या आंतरराष्ट्रीय संस्थांकडून मिळणारे कर्ज.

( ५ ) खाजगी संस्था–किंवा समाजवादी राष्ट्रातील सरकारकडून उधारीवर मिळणाऱ्या वस्तू वा कर्ज.

परकीय मदत जरी म्हटले तरी तिचे वेगवेगळे प्रकार नि त्याबाबतीतल्या भिन्नभिन्न अटी आहेतच. या सर्व बाबतीत नि विशेषतः परकीय मदतीच्या एकूण आकारमानातही गेल्या दहा वर्षांत अतिशय महत्त्वपूर्ण वाढ झालेली आहे. पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या कालखंडात परकीय मदत रु. १९६ कोट होती तर तिसऱ्या पंचवार्षिक योजनेत ती रु. २४५५ कोटीपर्यंत वाढली आहे.

काही वर्षांपूर्वी, परकीय मदत म्हटली म्हणजे तिच्याकडे पहाण्याचा दृष्टिकोण टीकात्मक होता व या बाबतीतले धोरणही काहीसे राखीवच असे. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेपासून हे सारेच बदलले नि जास्त जास्त भांडवल पुरवठा करण्याचे नि अंतर्गत आर्थिक विकास प्राप्त करून घेण्याचे एक महत्त्वाचे साधन म्हणून परकीय मदतीचे सरसकट खुल्या दिलाने स्वागत होऊ लागले. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या शेवटीशेवटी नि विशेषेकरून तिसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या कालखंडांत आपल्या अर्थव्यवस्थेला परकीय मदतीच्या–मुख्यत्वेकरून त्याबाबतीतल्या अनिश्चिततेच्या– अनुषंगाने निर्माण होणाऱ्या अनेक प्रश्नांना तोंड द्यावे लागले. दुसऱ्या पंचवार्षिक योजनेपासून ही अनिश्चितता काही अंशी तरी कमी करण्याचा एड इंडिया क्लबद्वारे, धनको राष्ट्रांशी पूर्वनियोजित वाटाघाटी करून, नि आय. बी. आर. डी. ( I. B. R. D. ) सारख्या आंतरराष्ट्रीय संस्थांवर जास्तीत जास्त विसंबण्याचे धोरण ठेवून केला जात आहे. या सर्व प्रयत्नांमुळे अंतर्गत औद्योगिक विकासामुळे आपला परदेशी व्यापार वाढला आहे नि त्याबरोबरच परकीय मदतीचा प्रवाहही जास्त विस्तृत नि जोरदार झाला आहे; पण त्याबाबतीतली अनिश्चितता मात्र आहे तशीच कायम आहे. काही काल अर्थशास्त्रज्ञांचे असे मत होते की परकीय मदतीची देवाणघेवाण आर्थिक पातळीवरूनच व्हावयास हवी व आर्थिक घटक हे मूलभूत नि दूरगामी स्वरूपाचे नि इतर भावना आणि मनोविकार यांच्या चढउतारांपासून अलिप्त असल्यामुळे परकीय मदतीत स्थिरता प्रस्थापित करणे सहज शक्य आहे, पण अनुभव मात्र काही वेगळेच सांगतो. राजकीय भावनाविष्कारांना परकीय मदतीच्या बाबतीत फारच महत्त्वाचे स्थान आहे. आणि जोपर्यंत राजनैतिक संबंध अतर्क्य आहेत, तोपर्यंत तरी परकीय मदतीचा ओघ अनिश्चितच राहाणार.

ही अनिश्चितता तशीच कायम राहाण्यास आणखी एक गोष्ट कारणीभूत आहे नि ती म्हणजे परकीय मदत देणाऱ्या नि घेणाऱ्या या दोन्हीप्रकारच्या राष्ट्रांच्या दृष्टिकोनात होत असलेले बदल. जेव्हा आपण सुरवातीला परकीय मदतीची कास धरली तेव्हा ती फारच अल्पावधीकरता म्हणून घेतल्यामुळे एकप्रकारच्या आशावादी मनस्थितीत तिचा स्वीकार केला गेला होता. पण आपल्या देशाच्या जलद आर्थिक विकास घडवून आणण्याच्या धोरणामुळे, अन्नधान्यांच्या तुटीमुळे नि चक्रवाढ गतीने वाढणाऱ्या कर्जाच्या नि त्यावरील व्याजाच्या भारामुळे परकीय मदतीवर जास्तजास्तच विसंबून राहाण्याखेरीज दुसरे गत्यंतर उरले नाही. हे वाढते परावलंबित्वच आपल्यासारख्या राष्ट्रांना अस्वस्थ करून सोडते नि हेच वारंवार केल्या जाणाऱ्या स्वावलंबनाच्या घोषणांतून दृगोचर होते. वाढती राजनैतिक पातळीवरची गुंतागुंत, जगातील राजकीय अधिकारी वर्तुळातील खळखळ नि ओढाताण, वेगवेगळ्या राष्ट्रांतील झगडे नि हेवेदावे या सर्व गोष्टींमुळे परकीय मदतीचा अंगीकार करणारे राष्ट्रही त्या मदतीबद्दल काहीसे साशंकच असते नि त्या राष्ट्राची मनोभूमिका त्या मदतीचे दिलखुलास स्वागत करण्याइतकी उत्साही राहात नाही, तर काहीशा अनिच्छेनेच, दुसरा उपाय नाही म्हणून, परकीय मदतीचे पाय धरले जातात. म्हणूनच जी परकीय मदत सुरवातीला आर्थिक विकासकार्याला उपकारक गणली जात होती ती आताशा गत्यंतर नाही म्हणून स्वीकारावयाची गोष्ट, काहीशा अनिच्छेनेच अंगीकारावयाची वस्तू ठरू पाहात आहे. दुरून मोहक पण जवळ गेल्यास कधी रक्तबंबाळ करेल याचा नेम नसणाऱ्या कांटेरी गुलाबासारखी ती वाटू लागली आहे. ' धरले तर चावते, सोडले तर पळते ' अशी काहीशी या परकीय मतदीबाबतची भावना होऊ पहात आहे.












दात्या राष्ट्रांची गोष्ट घेतली तरी तिथेही काहीसे असेच अनिच्छेचे, साशंकतेचेच वातावरण आहे; पण त्याच्या मुळाशी कारणे मात्र वेगळी आहेत. निरनिराळ्या देशात आर्थिक विकास चालू आहे हे जरी खरे असले तरी काही राष्ट्रांत अपेक्षित विकास घडून आलेला नाही नि या अशा राष्ट्रांच्या मालिकेत आपल्यासारख्या खूपच मोठ्या प्रमाणावर मदत मिळणाऱ्या राष्ट्रांचा समावेश करावा लागेल. एक तर मदतीच्या रकमेचा विनियोग कासवाच्या गतीने केला जातो पण काही काही वेळा तर मदतीच्या रकमेचा दुरुपयोग किंवा मदतीच्या रकमेतून करावयाच्या गोष्टींची अकार्यक्षम व्यवस्थाही आढळात येते. या व अशा गोष्टींचा परिणाम काय होतो तर अंतर्गत विकास घडून येत असतानासुद्धा या राष्ट्रांनी परकीय मदतीवर विसंबून राहाण्याचे काही सोडलेले नाही, इतकेच नव्हे तर जास्त जास्त परकीय मदतीची मागणी ही राष्ट्रे करीत आहेत. दात्या राष्ट्रांना ऋणको राष्ट्रांकडून कृतज्ञतेचा शब्द ऐकण्याचे समाधान मिळण्याचे दूरच राहिले पण काही प्रसंगी त्यांना याबाबतीतल्या त्यांच्या धोरणाबद्दल जहाल टीकासुद्धा ऐकून घ्यावी लागते. प्रगतीच्या मार्गावर वाटचाल करणाऱ्या राष्ट्रांना वेळोवेळी अनुभवी मार्गदर्शन करण्याचा प्रयत्न मदत देणाऱ्या आंतरराष्ट्रीय संस्थांकडूनही केला जातो पण या मार्गदर्शनाचे वा उपदेशाचे नेहमीच राजीखुशीने स्वागत होते असे मात्र नाही. उदाहरणच द्यायचे झाले तर बेल मिशनच्या भारतावरील रिपोर्टचे देता येईल. या सर्व गोष्टींचा परिपाक काय तर दोहींकडील राष्ट्रसरकारांना अंतर्गत टीकेला तोंड द्यावे लागते नि शिवाय दोन्ही टोकात मतभेद नि वादावादी कायम चालू राहाते; पण या सर्व कटकटी असूनही काही व्यक्ती नि संस्था यांच्या चिकाटीमुळे विकसनशील राष्ट्रांना होणाऱ्या परकीय मदतीच्या प्रवाहाचा ओघ अखंड टिकविणे नि उत्तरोत्तर वाढविणे शक्य झाले आहे. प्रगत राष्ट्रांतील काही जबाबदार व्यक्तींना हे आता कळून चुकले आहे की विकासकार्यात परकीय मदतीची भूमिका फारच महत्त्वाची आहे. आणि जसजशी अविकसित राष्ट्रात जलदगतीने प्रगती करावयाची प्रेरणा निर्माण होईल, द्रुतगतीने विकास साधण्याची इच्छा जागृत होईल तसतसा परकीय मदतीचा स्रोत तिकडे जास्त जोराने वाहावयास हवा. मदत घेणाऱ्या राष्ट्रांनाही आता ही जाणीव झालेली आहे की या मदतीचा विनिमय अधिक योग्यपणे व अधिक कार्यक्षमतेने करावयास हवा. जेव्हा आपण भारताला मिळणाऱ्या परकीय मदतीचा विचार करतो तेव्हा वर उल्लेखिलेल्या या सर्व गोष्टींच्या संदर्भात तो करावयास हवा. या परकीय मदतीच्या बाबतीत दुसरी एक विसंगती आढळून येते नि ती म्हणजे या ना त्या कारणाने परकीय मदतीचा बराचसा भाग अजूनही उपयोजिला गेलेलाच नाही. प्रामुख्ये करून देण्यात येणारी कर्जे बांधीव स्वरूपाची असल्यामुळे मदत मिळणाऱ्या राष्ट्रांच्या परकीय व्यापारात खूपच तूट दिसून येते नि त्याचमुळे सर्वसाधारण स्वरूपाच्या कर्जाची मागणी जास्तजास्त प्रमाणात करण्याची प्रवृत्ती वाढीस लागलेली दिसून येते.

परकीय मदतीच्या झऱ्याचा प्रवाह राजनैतिकसंबंधांवर अवलंबून असतो व तो अनिश्चित असतो ही सत्यस्थिती आहे व ती नाकारून चालण्यासारखे नाही. पण परकीय मदत म्हणजे गत्यंतर नाही म्हणून स्वीकारावयाची गोष्ट हा दृष्टिकोन टाकून देऊन, परकीय मदतीला विकासकार्यक्रमात एक विधायक कार्य आहे असे मानले तर ते अधिक योग्य ठरणार नाही काय? परकीय मदतीमुळेच आर्थिक विकासमार्गातील कितीतरी ओढाताण कमी होते. विकसनशील राष्ट्रांत या कालखंडात वाढणाऱ्या मागणीमुळे होणाऱ्या भाववाढीलाही परकीय मदतीमुळेच कितीतरी आळा बसतो. परकीय मदतीमुळे उपलब्ध साधनात वाढ होत असल्यामुळे द्रुतगतीच्या विकासास आवश्यक असलेली परिस्थिती निर्माण होते पण जे आतापर्यंत नीटसे उमगलेले नाही, किंवा जी गोष्ट उघडपणे जाणून घेण्याचा यत्न केला गेलेला नाही ती म्हणजे मदत घेणाऱ्या देशाच्या अर्थव्यवस्थेत निर्माण व्हावी लागणारी पूरक परिस्थिती. अन्नधान्यांच्या वाढत्या मागणीला तोंड देण्यासाठी जेव्हा अन्नधान्यांची आयात केली जाते तेव्हा शिल्लक पडणारी उत्पादसाधने पुढील उत्पादनासाठी गुंतविली गेली पाहिजेत. त्यामुळे उत्पादनात वाढ झाली पाहिजे. या आयातीबरोबरच औद्योगिक व शेतकी दोन्ही विभागातील उत्पादनक्षमतेत वाढ झाली पाहिजे. जेव्हा कच्च्या मालाची आयात केली जाते तेव्हाही त्या त्या औद्योगिक क्षेत्रात उत्पादनक्षमता बरोबरीने








वाढली पाहिजे. जर इतर उत्पादनोपयोगी वस्तूंचा परकीय मदतीद्वारे पुरवठा करण्यात आला तर या वस्तू जे जे म्हणून उद्योगधंदे वापरतात त्या त्या ठिकाणी योग्यप्रकारे त्यांचा विनियोग होतो की नाही याची दक्षता घेतली पाहिजे. याबाबतीत जपानचे व इतर काही देशांचे उदाहरण लक्षात घेण्यासारखे आहे. या देशातील परकीय मदतीचा इतिहास पाहू गेल्यास प्रकर्षाने ही गोष्ट जाणवते की अंतर्गत अर्थव्यवस्थेने परकीय मदतीच्या प्रवाहाशी योग्य तऱ्हेने जुळवून घेतले पाहिजे, जलद विकासाला योग्य अशी परिस्थिती निर्माण केली पाहिजे, योग्य प्रकारच्या संस्था निर्मिल्या पाहिजेत, अंतर्गत बचत वाढली पाहिजे, जास्तजास्त भांडवलाची गुंतवणूक झाली पाहिजे. हे सर्व झाले तरच . . . तरच परकीय मदत आर्थिक विकासकार्यांत परिणामकारक नि महत्त्वपूर्ण साथ देऊ शकेल. पण हे जर न झाल्यास परकीय भांडवलामुळे औद्योगिक क्षेत्रात काही वेगवेगळया ठिकाणी विभक्त स्वरूपाची प्रगती होईल पण त्या त्या ठिकाणीसुद्धा ती तुरळक स्वरूपाची, मधूनच डोके वर काढणारी नि कमी कार्यक्षम अशी राहील. जेव्हा आपण खूपच मोठ्या प्रमाणावर परकीय मदतीचा अंगीकार करतो नि त्याकरिता बरीच जबर किंमतही देतो तेव्हा त्यावेळी हीही खबरदारी घेतली पाहिजे की ही परकीय मदत जास्त कार्यक्षम होऊन आपल्या देशाची या मदतीची परतफेड करण्याची पात्रता वाढण्यासाठी आपल्या एकूण राष्ट्रीय उत्पन्नात महत्त्वपूर्ण वाढ झाली पाहिजे व त्याकरिता जरूर असलेली अनुकूल परिस्थिती देशात निर्माण झाली पाहिजे.

याशिवाय याबाबतीत विशेष लक्षात ठेवावयाच्या गोष्टी म्हणजे परकीय मदतीच्या बाबतीतली अथपासून इतिपर्यंतची व्यवस्था नि संघटना. जेव्हा परकीय मदतीबाबत वाटाघाटी चालू असतात तेव्हा आपल्या पक्षाच्या लोकांना त्या योजनेच्या आर्थिक, सांपत्तिक, तांत्रिक या सर्व बाबींची कसून माहिती असली पाहिजे. याशिवाय या योजनेचे दूरगामी परिणाम, या मदतीद्वारे होणारी वेगवेगळया वस्तूंची नी साधनांची आयात या सर्व गोष्टींचाही खोलवर विचारविनिमय व्हावयास हवा. मदत देणाऱ्या संघटनाही या व अशा तऱ्हेच्या दृष्टिकोनाचे सहर्ष स्वागत व कौतुक करतील. यासंदर्भा-तील धोरण नि त्याबाबतीतले निर्णय यांच्यावर जरी केवळ आर्थिकच नव्हे तर इतर अनेक बाबींचा पगडा असला तरी परकीय मदतीकडे बघण्याचा दृष्टिकोन संपूर्णपणे तांत्रिक नि व्यावहारिक असावा व कुठल्याही प्रकारच्या इतर काल्पनिक, निरर्थक, व अव्यवहारी गोष्टींपासून अलिप्त असावा. त्याचप्रमाणे या मदतीचा विनियोग, मदतीच्या प्रवाहाचे नियंत्रण, त्यावरील देखरेख, त्याची दिशा, त्यामुळे साध्य झालेल्या प्रगतीचे मूल्यमापन या गोष्टी वारंवार तपासल्या गेल्या पाहिजेत. पण हे सर्व करताना पूर्वग्रहविरहित निःपक्षपातीपणाची दृष्टी ठेवावयास हवी. दात्या राष्ट्रांचा अनुभव नि उपदेश यांचा निदान जास्त सखोल अभ्यास व्हाव-यास हवा आणि जिथेजिथे योग्य वाटेल तिथेतिथे त्याचा स्वीकार व्हावयास हवा. राष्ट्राराष्ट्रांमधून साधनसामग्रीच्या देवाणघेवाणीने घडून येणारा आर्थिक विकास हा सहकारी तत्त्वावर उभारलेला आहे. जेव्हा नियोजनकार्यात परकीय मदतीचा आपण विचार करतो तेव्हा जणू काही या साऱ्या गोष्टींना आपण मूर्त स्वरूप देत असतो. यामुळेच परकीय मदत म्हणण्याऐवजी साधनसामग्रीचा प्रवाह वा स्रोत म्हणणे जास्त सार्थ ठरेलसे दिसते.

आपल्याला या परकीय साधनसामग्रीची अतिशय निकडीची जरूर आहे आणि परकीय मदतीवर विसंबून राहाणेही अपरिहार्य आहे. परदेशी व्यापाराच्या बाब-तीत आपण पूर्ण स्वावलंबी झाल्याशिवाय, म्हणजेच निर्यात नि आयात यांचा मेळ बसल्याशिवाय मोठ्या प्रमाणावर आयात करण्याची जरूरी आपल्याला भास-तच राहणार. आपल्यापाशी असलेला परकीय चलनाचा साठा पण अगदीच तुटपुंजा असल्यामुळे कुठल्याही आणीबाणीच्या परिस्थितीत जास्त आयात करण्याची पाळी आली म्हणजे परिस्थिती फारच बिकट होते. मग ती आयात देशातील पुरांमुळे वा दुष्काळांमुळे असो अथवा सीमेवरील तंट्यामुळे असो. सध्यातरी अंतर्गत विकासाची पातळी उंच ठेवण्यासाठी जास्त-जास्त प्रमाणात आयात करण्याशिवाय गत्यंतर दिसत नाही. कर्जव्याजापोटीसुद्धा जास्त प्रमाणात भांडवलाची आयात करणे जरूर होऊन बसेल. अगदी अलिकडेच केलेली भावी निर्यातीबद्दलची अनुमानेसुद्धा हेच दर्श-वितात की खूप मोठ्या प्रमाणावर निर्यातीत वाढ










होण्याची शक्यता सध्यातरी मर्यादितच आहे. याशिवाय निर्यात न वाढण्याची इतर काही कारणे आहेत. उदाहरणार्थ वाढत्या किंमती, वाढती मजुरी नि पगार यांचे दुष्टवर्तुळ, निर्यात वस्तूंचा दर्जा एक नसणे, किंवा निर्यातीची वाढ होण्यासाठी योग्य ते प्रयत्न न होणे. रुपयाच्या अवमूल्यनानंतर आलेला अनुभवही विकसनशील राष्ट्रांना निर्यातवाढ करण्याच्या कामी येणारे अडथळेच प्रकर्षाने दर्शवितो. हे मान्य केलेच पाहिजे की आयात निर्यातीच्या बाबतीतली सध्याची परिस्थिती निदान पुढची सात ते दहा वर्षे तरी तशीच कायम राहाणार. परदेशी व्यापारातील लांब मुदतीची तूट शीघ्रगतीने भरून काढणे तर जवळजवळ अशक्यप्रायच आहे. ही तूट भरून काढण्यासाठी अंतर्गत भांडवलवाढीला आळा घालणे तर अतिशय जरूरीचे आहे. हेही तावडतोब करता येणे शक्य नाही, तर त्याकरिता दूरगामी उपाय नि लांब मुदतीच्या योजना आवश्यक आहेत आणि जोपर्यंत हे आवश्यक ते सर्व बदल घडून येत नाहीत तोपर्यंत परकीय मदतीवर अवलंबून राहण्याशिवाय गत्यंतर नाही.

परकीय मदतीची आयात करावयाची नाही असे जरी क्षणभर मान्य केले तरी त्याबद्दलचे इतर पर्याय आहेत ते इतके कटकटीचे, तापत्रयाचे नि गुंतागुंतीचे आहेत की परकीय मदतीबाबत विशेष चिकित्सकपणा करण्यास वावच उरत नाही. सध्यातर परिस्थिती अशी आहे की पुरेशी मदत मिळविणेही काहीसे अवघड होऊन बसले आहे. त्याकरीता वेगवेगळ्या अटींचा स्वीकार करावा लागतो, कायम अनिश्चिततेच्या धुक्यात वावरावे लागते, वाटाघाटी करून करून जीव मेटाकुटीस येतो नि शिवाय मदतीबद्दली जबर किंमत द्यावी लागणार ही गोष्ट वेगळीच आणि यास्तव उपलब्ध झालेल्या साधनसामग्रीचा जास्तीत जास्त उपयोग करून घेणे फारच महत्त्वाचे ठरते. पंचवार्षिक योजनांच्या बाबतीतले नि परदेशी भांडवल आयात करण्याच्या बद्दलचे या दोन्ही धोरणाचा योग्य मेळ बसून त्यात सुसूत्रता आणल्यासच हे करता येणे शक्य आहे. पण हे जरी शक्य असले तरी प्रत्यक्षात तसे घडून आले आहे किंवा नाही याचीही वारंवार कसून तपासणी झाली पाहिजे. याशिवाय मध्यवर्ती सरकार नि राज्यसरकारे, वेगवेगळी सरकारी खाती, नि परकीय मदतीचा जास्त प्रमाणावर वापर करणारा सरकारी विभाग यांच्यातही सुसंबद्धता नि सहकार्य असले पाहिजे. परकीय मदतीच्या विनियोगाचा प्रश्न हा वरवर दिसतो तितका सोपा नाही. तर आयातनिर्यातीवरील नियंत्रणे, वेगवेगळे परवाने नि धोरणे यासारख्या औद्योगिक प्रगतीशी संबंधित असणाऱ्या अनेक बाबींशी तो निगडित आहे. परकीय मदतीद्वारे नियोजित नि संपूर्ण औद्योगिक प्रगती घडून न आल्यास ती मदत अर्थव्यवस्थेच्या विकासाला फारशी उपकारक ठरणार नाही नि विकासाबरोबर निर्माण होणारी ओढाताणही फारशी कमी करू शकणार नाही. अंतर्गत अर्थव्यवस्थेत हवे असलेले बदल घडवून आणून परकीय चलनाच्या साठ्यांचा उपयोग कार्यक्षमतेने करण्यावरच आयात कमी करून निर्यात वाढविण्याच्या धोरणाची यशस्विता अवलंबून राहील. परकीय मदतीचा प्रत्येक क्षेत्रांतील विनियोग, त्याचे आर्थिक नि सामाजिक फायदेतोटे, यांचे मूल्यमापन वेळोवेळी केले गेले पाहिजे. परकीय मदतीद्वारे आपण कमीतकमी आर्थिक ओढाताणीत द्रुतगतीचा आर्थिक विकास साधू शकू की नाही हे आपण आयात साधनसामग्री किती कार्यक्षमपणे वापरतो नि वेगवेगळ्या अंतर्गत क्षेत्रात अनुकूल नि पूरक असे प्रयत्न कसे करतो यावर सर्वस्वी अवलंबून राहील. याचवेळेस आपले किंमतीकडेही दुर्लक्ष होऊन चालणार नाही. ( केवळ राजकीय अर्थानेच नव्हे ). आपण या साधनसामग्रीच्या वापराकरता मोबदला देतो ती मिळविणेही कमी कटकटीचे नाही. अशी ही परकीय मदत मिळवताना स्वत्व न विसरता मानाने ती मिळवून नि तितक्याच कार्यक्षमपणे ती वापरल्यास नजीकच्या भविष्यकाळात स्वावलंबनाचे सोनेरी स्वप्न आपल्याला साकारता येईल.

प्रा. म. दा. साठे

# वेदांतील स्वरांविषयी काही विचार

## प्रास्ताविक

संस्कृत व्याकरणशास्त्राचा – विशेषत: पाणिनीच्या अष्टाध्यायीचा– अभ्यास करीत असता ' स्वरप्रक्रिया-प्रकरण ' फार क्लिष्ट व गुंतागुंतीचे वाटले. त्या मानाने इतर सर्व भाग तसे वाटले नाहीत हे त्यांचा सविस्तर विवेचनासह मराठी अनुवाद करीत असता माझ्या लक्षात आले.

पाश्चात्य उच्चारशास्त्र किंवा ध्वनिशास्त्र ( phonetics किंवा phonology ) हे प्रत्यक्षात येऊन अजून एक शतकही झाले नाही, परंतु भारतात मात्र त्याचे अस्तित्व दोन अडीच सहस्रवर्षांपूर्वीचे आहे.[1]

ऋग्वेद, ऋक्प्रातिशाख्य, सामवेदाचे ऋक्तंत्र व्याकरण, कृष्णयजुर्वेदाचे तैत्तिरीय प्रातिशाख्य, शुक्ल यजुर्वेदाचे वाजसनीय किंवा कात्यायन प्रातिशाख्य व अथर्ववेदाचे अथर्व प्रातिशाख्य यामध्ये वेदांतील स्वरांचा व वर्णोच्चारांचा ऊहापोह केला आहे. पूर्वी प्रातिशाख्ये वेदांच्या प्रत्येक शाखेची होती पण त्यापैकी बरीचशी लुप्त झाली. याशिवाय 'शिक्षा' ग्रंथांतही या विषयाची चर्चा केलेली आहे. प्रातिशाख्य ग्रंथांचा काल सामान्यत: इ. पू. ५०० ते १५० समजला जातो पण शिक्षाग्रंथ यापूर्वीचे म्हणजे इ. स. पू. ८०० ते ५०० आहेत असे विद्वानांचे मत आहे. शिक्षा आणि प्रातिशाख्ये यात विरोध असल्यास ' शिक्षा ' दुर्बल ठरते, ज्याप्रमाणे मृगी सिंहापुढे ठरते. यासंबंधी एक प्राचीन वचन आहे ते येणेप्रमाणे –

' शिक्षा च प्रातिशाख्यं च विरुध्येते परस्परम् ।
शिक्षैव दुर्बलेत्याहुः सिंहस्यैव मृगी यथा ॥ '

– ( सर्वसंमत शिक्षा )

' तस्यादित उदात्तमर्धह्रस्वम् ' । १-२-३२ यावर लिहिताना डॉ. कील्हार्न म्हणतो व्याकरणाचे ज्ञान होण्यास स्वरांचे ज्ञान आवश्यक आहे. शिक्षाग्रंथांत म्हटले आहे की स्वरांचे अशुद्ध उच्चारण झाल्यास ते करणारा कुंभीपाक नरकात प्रवेश करतो ! प्रातिशाख्यावरील फारच थोड्या टीका आज उपलब्ध आहेत, त्यात उवटाचे भाष्य महत्त्वाचे आहे.

## स्वरांविषयी सामान्य विचार

व्यवहारामध्ये लोक बोलत असतात तेव्हा त्यांच्याकडून न कळता त्या भाषेचे सस्वरच ( आघातासह with accents ) उच्चारण होत असते. कोणतीही भाषा घ्या. दोन किंवा अधिक अक्षरांच्या शब्दांचे उच्चारण करताना एका विशिष्ट अक्षरावर ( syllable ) आघात देऊन लोक उच्चार करतात. सामान्यत: हा आघात गुरु स्वरावर दिलेला असतो व जोड अथवा सामासिक शब्द असल्यास दुसरे अर्ध साधारणत: अर्थदृष्ट्या अधिक महत्त्वाचे असल्याने त्यावर हा आघात दिसून येतो. प्रत्ययाला प्रकृतीपेक्षा अर्थदृष्ट्या अधिक महत्त्व असल्यामुळे प्रत्ययस्वर हा साधारणत: आघातयुक्त म्हणजे उदात्त आढळून येतो ( महाभाष्य उपसंहार, पान ३३३ ). अनेक पदे मिळून झालेल्या वाक्याचा उच्चार करताना काही शब्दांना कमी महत्त्व असल्याने त्यांचे आघातरहित म्हणजे सर्वानुदात्त उच्चारण होते.

## स्वरावरून अर्थपरीक्षण

पाणिनिकाली स्वरयुक्त शब्दोच्चारण, हे काही विशिष्ट वैदिकग्रंथ–ब्राह्मणे, आरण्यके व उपनिषदे– व विशिष्ट वैदिक कर्मे सोडल्यास – वैदिक भाषेमध्ये सर्वत्र उपलब्ध असल्यामुळे व शिष्ट लोकांच्या व्यवहारातही स्वभावत:च शब्दोच्चारण स्वरयुक्त होत असल्याने पाणिनीने वैदिक आणि लौकिक भाषांतील स्वरांचे नियम व त्यांना बारीक सारीक अनेक अपवाद सांगितले. पाणिनीनंतर लवकरच बहुजन समाजाच्या व्यवहारामध्ये संस्कृत भाषेचे स्थान स्वररहित अशा

1. 'In India, more than two thousand years ago there flourished a science of Phonetics more advanced than any that has since been known until very recent times.'

–'Ancient Indian Phonetics' ( Allen W. S. )



अनुक्रमणिका






## वेदांतील स्वरांविषयी काही विचार

प्रांतीय प्राकृत भाषांनी घेतले. ग्रंथनिर्मिति जरी संस्कृत भाषेत चालू राहिली तरी भाषेमध्ये, विद्वत्सभांमध्ये व पाठशालातही स्वरांकडे लक्ष कमी झाले. भाष्यकार पतंजलीनंतर संस्कृत भाषेचे अध्ययन व अध्यापन हे बहुतांशी शास्त्रीय व लौकिक संस्कृत वाङ्मयापुरतेच मर्यादित राहिले व वेदग्रंथांना वैदिक लोकांच्या पठन-पाठनातच स्थान राहिले. याचा परिणाम असा झाला की व्याकरणग्रंथनिर्मिती व अध्ययनाध्यापन यामध्ये स्वरप्रक्रिया व वैदिकीप्रक्रिया याकडे लोकांचे दुर्लक्ष झाले व व्यवहारातील शब्दोच्चारण स्वररहितच होऊ लागले. अलीकडे पाठशालातूनसुद्धा या विषयांचे अध्यापन होत नाही व आमच्या शास्त्रीमंडळींनाही हे दालन अज्ञातच असते. आता पाश्चात्त्य विद्वानांचे या विषयाकडे लक्ष गेल्याने आपल्याकडील आधुनिक विद्वानही या विषयाचा अभ्यास करू लागले आहेत.

### वेदसंहितांचा अर्थ समजण्यासाठी स्वरांचे महत्त्व

स्वरांमध्ये उदात्त, अनुदात्त व स्वरित हे मुख्य स्वर असून –अलीकडच्या भाषेत बोलावयाचे तर Accents किंवा आघात– हे मुख्यत्वेकरून वैदिक संहितातच आढळून येतात. हे जरी खरे असले तरी लौकिक भाषेतही ते होते हे पाणिनीच्या अष्टाध्यायीतील सूत्रांवरून स्पष्ट होते. उदाहरणार्थ, 'ओदनं पचति' हेच वाक्य जर 'पचत्योदनम्' असे उच्चारले तर स्वर किंवा आघात बदलतात. 'तिङ्ङतिङः' ८।१।२८ हे सूत्र त्याला कारण आहे. हे सूत्र सांगते की अतिङन्तापुढे तिङन्तपद आल्यास त्याला (तिङन्ताला) निघात म्हणजे अनुदात्त होतो. पहिल्या वाक्यात 'ओदनं पचति' यात तशी स्थिति आहे तर दुसऱ्यात तशी नाही म्हणून ही वाक्ये उच्चारताना स्वर (आघात) बदलतात. स्वराप्रमाणे अर्थ बदलतो हे मान्य केल्यावर वेदांचा अर्थ कळण्यास या स्वरांचे चांगलेच ज्ञान पाहिजे हे ओघानेच आले. उदाहरणच द्यावयाचे तर 'इन्द्रशत्रुः' हे प्रसिद्ध उदाहरण देता येईल. महाभाष्यात पतंजलि व्याकरण-शास्त्राच्या अध्ययनाचे प्रयोजन देताना पहिल्या आह्निकात म्हणतो–

'दुष्टः शब्दः स्वरतो वर्णतो वा मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह। स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुः स्वरतो-ऽपराधात्' ॥ म. भा.

अर्थ– 'स्वराने किंवा वर्णाने अशुद्ध शब्द हा बरोबर न योजल्यामुळे योग्य अर्थाचे प्रतिपादन करीत नाही. असा हा शब्द वज्रासारखा होतो व ज्याप्रमाणे 'इन्द्रशत्रु' शब्दाने स्वरातील दोषामुळे यजमानाचा घात केला त्याप्रमाणे हा अशुद्ध शब्दही यजमानाचा नाश करतो.' 'इन्द्रशत्रु' यातील 'शत्रु' शब्दाचा अर्थ घातक असा आहे. इन्द्राला मारणारा पुत्र उत्पन्न व्हावा या हेतूने केलेल्या यज्ञामध्ये 'इन्द्रशत्रु' असा पुत्र दे अशी यजमानाने –यज्ञ करणाऱ्याने– प्रार्थना केली. ती करतेवेळी ऋत्विजांनी 'इन्द्रशत्रु' शब्द उच्चारताना तत्पुरुष समासाचे स्वर (आघात) उच्चारण्याऐवजी बहुव्रीही समासाचे स्वर लावून त्याशब्दाचे उच्चारण केले. त्याप्रमाणे त्या शब्दाच्या अर्थात बदल होऊन 'इन्द्र ज्याला मारणारा आहे असा मुलगा' असा अर्थ झाला! त्याचा परिणाम असा झाला की पुढे युद्धामध्ये त्याप्रमाणे इन्द्राने त्याला ठार केले. भाष्यकार पतंजलीने दुसरे उदाहरण दिले आहे 'स्थूलपृषतीमाग्निवारुणीमनड्वाहीमालभेत' –याचा अर्थ 'अग्नि आणि वरुण देवतांना उद्देशून 'स्थूल पृषती' अशा गायीचा बलि द्यावा.' या वाक्यात 'स्थूलपृषती' या शब्दाच्या अर्थाविषयी संशय उत्पन्न होतो. स्थूल आणि पृषती म्हणजे 'ठिपक्या ठिपक्याची गाय' असा अर्थ घ्यावयाचा किंवा "स्थूल पृषत्' म्हणजे मोठमोठे ठिपके अंगावर आहेत अशी गाय" असा अर्थ घ्यावयाचा? स्वरावरुन अर्थाचा निश्चय करता येतो. तो कसा? 'स्थूल' या पूर्वपदाचे स्वर जर कायम राहिले तर तो बहुव्रीही समजावा. जर 'पृषती' यातील शेवटला ईकार उदात्त असेल तर तो तत्पुरुष समजावा. हा समास कर्मधारय मानावा लागेल कारण कर्मधारय हा तत्पुरुषाचाच पोटभेद आहे. म्हणजे 'स्थूला चासौ पृषती च' असा कर्मधारय किंवा 'स्थूलानि पृषन्ति यस्याः सा' असा बहुव्रीही होतो. बहुव्रीही झाल्यास 'स्थूल' शब्दातील शेवटचा वर्ण उदात्त होतो व त्यामुळे त्याच्या पुढील अनुदात्त वर्ण स्वरित होतो. कारण उदात्तापुढे अनुदात्त आल्यास 'उदात्तानुदात्तस्य स्वरितः'। ८।४।६६ या सूत्राने तो स्वरित होतो व या स्वरितापुढील दोन

अनुदात्तांचा प्रचय म्हणजे 'एकश्रुति' होते, तेव्हां हे स्वर लक्षात घेऊन येथे कोणता समास आहे हे ठरविता येते.

### वेदस्वरांचे सातत्य

वेदातील स्वर जसेच्या तसेच मौखिक शिक्षणाने आज हजारो वर्षे टिकले अशी समजूत आहे व याविषयी दुमत नाही. वेदकाल जरी अनिश्चित असला तरी ते फार प्राचीन आहेत.– निदान ऋग्वेदसंहिता खास आहे. वेदरचनाकाली लिपि अस्तित्वात नव्हती व ते गुरुमुखातून मौखिक अध्यापनाने जसेच्या तसे शिष्याकडे आले. जर चुकून दोष राहिले तर ते पुढच्या पिढ्यात तसेच राहणार. पण आपण असे गृहीत धरून चालू की सस्वर वेदपठनात दोष राहिले नाहीत व या क्षणापर्यंत ते जसेच्या तसेच राहिले आहेत! पूर्वी लिपि नसल्याने गुरुमुखोच्चारित वेदपठनाला महत्त्व होते व आजही आहे. लिपिनिविष्ट वेद झाल्यानंतर त्यात दोष राहणे शक्य आहे. पोथीवरून वेदपठन करणे पूर्वी पाप समजले जात असे ते यासाठीच!

### पाणिनीच्या स्वरविधायक सूत्रांचा आधार

या स्वरांच्या आविष्कारात इतकी गुंतागुंत आहे की व इतके बारकावे आहेत की ते उच्चार मुखातून नियमाप्रमाणे काढणे केवळ अशक्यप्राय आहे. अष्टाध्यायीत पाणिनीने स्वरप्रक्रियेसाठी चारशेहून अधिक सूत्रे रचिली व त्याशिवाय त्यानंतर लवकरच शांतनवाचार्याने 'फिट्' सूत्रे रचिली. त्यांची संख्या जरी ८८ इतकीच असली तरी ती सूत्रे महत्त्वाची असून पाणिनिसूत्रांना पूरक आहेत असे डॉ. गो. वि. देवस्थळी यांचे मत आहे. त्यांनी ही सूत्रे इंग्रजी भाषांतरासह नुकतीच प्रसिद्ध केली असून त्यांना चाळीस पानांची एक उद्बोधक प्रस्तावना जोडली आहे. पाणिनीने ही इतकी स्वरसूत्रे कोणत्या आधारावर रचली? ती काही वेदासारखी स्वयंभू नाहीत! पाणिनिकाली वेद सस्वर व अर्थासकट मुखोद्गत असत. आचार्य पाणिनीसारख्या दिव्यदृष्टीच्या वैयाकरणाच्या दृष्टीत हे सर्व स्वर अर्थासह असले पाहिजेत व त्यावरून त्याने ४०० सूत्रांच्या रचनेने ही स्वरविधि–सूत्रे अष्टाध्यायीत घातली. अष्टाध्यायीच्या सहाव्या अध्यायाचा उत्तरार्ध व सातवा अध्याय यासाठी राखून ठेवला. इतर अध्यायांतही मधून मधून ती प्रकरणभेदाने आहेतच. वैयाकरण हा लक्ष्यैकचक्षुष्क असतो. 'प्रयोगशरणा वैयाकरणाः' या वचनाप्रमाणे भाषेतील शब्दांची रूपे व प्रयोग पाहून व्याकरणकार नियम करीत असतो. यादृष्टीने पाणिनीची सूत्रे लावून सिद्ध झालेले सस्वर शब्द प्रयोगामध्ये कसे उपलब्ध होतात हे पाहणे झाल्यास हल्ली उपलब्ध असलेल्या सस्वर संहिता व ब्राह्मणग्रंथ यांचा स्वरदृष्ट्या अभ्यास करणे आवश्यक आहे. अर्थात् हे काम केवळ वैयाकरण अथवा केवळ मीमांसक, निरुक्तिज्ञ, भाषाशास्त्रज्ञ किंवा शब्दार्थचिकित्सक अशा आधुनिक विद्वानांकडून होण्यासारखे नाही. उपलब्ध असलेल्या वेदवाङ्मयाचा संपूर्ण अभ्यास, प्रातिशाख्ये व पाणिनिसूत्रे यांचे संपूर्ण परिशीलन केलेल्या व मीमांसादि शास्त्रे माहीत असलेल्या विद्वानाकडूनच हे कार्य होणे शक्य आहे. पाणिनिसूत्राप्रमाणे स्वरसिद्धि कोठे आढळून न आल्यास किंवा आढळून आल्यास वेदभाष्यकारांनी दिलेल्या अर्थापेक्षा निराळा अर्थ घ्यावा लागतो की काय व तो घेतल्यास जेथे जेथे तो शब्द येतो तेथे तेथे तो अर्थ लागू पडतो की नाही यासारख्या प्रश्नांचे विवेचन होणे आवश्यक आहे. तसे झाल्यास वेदग्रंथाच्या अभ्यास करण्याच्या आधुनिक पद्धतीत एका नव्या पण महत्त्वाच्या पद्धतीत भर पडेल. पाणिनीने अर्थाकडे पूर्ण लक्ष देऊन स्वरविवेचन केले असल्यामुळे स्वरदृष्ट्या जर निराळा अर्थ घेणे भाग पडेल तर तो इतर अर्थापेक्षा अधिक ग्राह्य ठरेल यात शंका नाही. वेद आणि व्याकरण यांच्या विशेष अभ्यासासाठी केंद्र सरकारने पुण्यास 'प्रगत संस्कृत अभ्यासकेंद्र' (Centre of Advanced Study in Sanskrit) निर्माण केले आहे. त्या संस्थेकडूनच वरील कार्य होणे शक्य आहे. ते एकट्यादुकट्याचे काम नाही. किंवा पुणे येथील 'वैदिकसंशोधनमंडळाचे' आहे.

### पाणिनिसूत्रांवरून वेदस्वरांचे संशोधन

पाणिनीने वेदावरून प्रथम सूत्रे रचिली पण आता त्याच्या सूत्रावरूनच वेदार्थ लावण्याची उलट प्रक्रिया अंगीकारावी लागत आहे. सध्या वैदिक लोक जे वेदपठन करतात ते अशुद्ध असते असे प्रत्ययास येते. वेदसंहितेत बदल होऊ नये म्हणून पद, क्रम, जटा, माला, शिखा व शेवटी घन इत्यादि अष्टविकृतींनी त्या बांधून पक्क्या केल्या. वेदसंहितेची शाकल्याने पदे










पाडून पदपाठ केला हे वेदांचे पहिले संशोधन होय असे म्हणण्यास हरकत नाही. 'पदप्रकृतिः संहिता' असे एकवचन आहे. त्याप्रमाणे ऋषींनी पहिल्याने पदे रचिली व मग त्यांची संहिता झाली असे काहींचे म्हणणे आहे; पण यात उलटा क्रम दिसतो. ऋषि मनात अगोदर ऋचाच म्हणणार व मग तिची पदे पडणार. आता पदपाठ म्हणताना मूळ वेदसंहितेतील मूळचे स्वर बदलणारच. कारण संधि तोडले –पदच्छेद केला– म्हणजे स्वर बदलावेच लागतात. पदपाठात पदे तोडताना मध्ये अनार्ष इति पद घालावे लागते. उदाहरणार्थ, 'मरुद्भ्याम्' यात दोन पदे आहेत. 'भ्याम्' प्रत्यय पुढे असता पाणिनिसूत्राप्रमाणे 'मरुत्' इतक्या भागाला पदसंज्ञा होते. हा पदच्छेद करताना स्वर बदलावे लागतात. तसेच पुढच्या विकृतीविषयीही म्हणता येईल. 'मरुद्भ्याम्' याचा पदपाठ 'भ्याम् इति मरुत्' असा म्हणावा लागतो.

## मुखातील भिन्नभिन्न स्वरांचा आविष्कार

मागे सांगितलेच आहे की मुख्य स्वर उदात्त, अनुदात्त आणि स्वरित असून त्यांचे अनेक पोटभेद आहेत, त्यांचा थोडक्यात विचार करू. 'उदात्त' स्वराची व्याख्या पाणिनीने 'उच्चैरुदात्तः' । १।२।२९ या सूत्रात केली आहे. यावर व्याख्यान करताना काशिकाकार म्हणतो– "उच्चैरुपलभ्यमानो योऽच् स उदात्त संज्ञो भवति। उच्चैरिति न श्रुतिप्रकर्षो गृह्यते यथा उच्चैर्भाषते अथवा उच्चैः पठति। किं तर्हि ?। स्थानकृतमुच्चत्वम्।" तर भट्टोजि दीक्षित म्हणतो– 'ताल्वादिषु सभागेषु स्थानेषु ऊर्ध्वभागे निष्पन्नोऽच् उदात्तसंज्ञः स्यात्'। या सूत्रातील 'उच्चैः' पदाचा अर्थ स्पष्ट व्हावयास पाहिजे. 'उच्चैः' म्हणजे मोठ्याने असा अर्थ नाही, जसा 'उच्चैः पठति' या वाक्यात आहे. मग कोणचा अर्थ अभिप्रेत आहे ? 'उच्चैः' म्हणजे उच्चार करताना जिव्हेच्या अग्राचा स्पर्श कण्ठ, तालु वगैरे त्यात्या स्थानांच्या वरच्या भागात झाल्यास ते 'उच्च' उच्चारण समजावे व ते 'उदात्त' स्वराचे समजावे; व त्या स्थानांच्या अधोभागी जिव्हेचा स्पर्श झाला तर तो अनुदात्त स्वर समजावा हे 'नीचैरनुदात्तः' १।२।३० या सूत्राने सांगितले आहे. व या दोन स्वरांचे –उदात्तानुदात्तांचे– काही प्रमाणात मिश्रण (समाहार) झाले तर तो स्वरित होतो असे 'समाहारः स्वरितः'। १।२।३१ या सूत्रात सांगितले आहे. या मिश्रणाचे प्रमाण तो अच् ऱ्हस्व, दीर्घ अथवा प्लुत असल्यास भिन्न राहते हे 'तस्यादित उदात्तमर्धह्रस्वम्' १।२।३२ या सूत्रात सांगितले आहे. कोणते ते प्रमाण ? ऱ्हस्व, दीर्घ व प्लुत स्वर उच्चारताना जो काल लागतो त्यांना 'मात्रा' म्हणतात. उदाहरणार्थ, ऱ्हस्वाची एक, दीर्घाच्या दोन व प्लुताच्या तीन मात्रा व व्यंजनाचा उच्चार करताना अर्धमात्रा काल लागतो हे पाणिनीने 'ऊकालोऽज्झ्रस्वदीर्घप्लुतः।' १।२।२७ यात सांगितले आहे. आता उदात्त, अनुदात्त व स्वरित हे अचाचे म्हणजे स्वराचे –व्यंजनाचे नव्हेत– धर्म असल्याने हे स्वरित उच्चारताना त्यांच्या मात्रात फरक पडणारच. उदाहरणार्थ ऱ्हस्व स्वरित उच्चारताना अर्धी मात्रा उदात्ताची व अर्धी अनुदात्ताची. दीर्घ स्वरिताच्या उच्चारणकाली अर्धी उदात्ताची तर दीड अनुदात्ताची व प्लुताच्या वेळी अर्धी उदात्ताची व अडीच मात्रा अनुदात्ताच्या. तात्पर्य, ऱ्हस्व, दीर्घ किंवा प्लुताच्या स्वरित स्वरांचे उच्चारण करताना नेहमी अर्धी मात्राच उदात्ताच्या वाट्याला येते. याशिवाय 'उदात्ततर' म्हणजे जिव्हेने त्या स्थानाच्या अगदी वरच्या टोकाला स्पर्श केल्यास व अनुदात्ततर किंवा 'सन्नतर' त्या स्थानाच्या अगदी अधोभागाच्या शेवटच्या भागास स्पर्श केल्यास होतो. याशिवाय 'एकश्रुति' म्हणजे यापैकी कोणत्याच स्वराचे उच्चारण न करता वाक्य म्हणावयाचे. उदाहरणार्थ, 'इमं मे गङ्गे यमुने सरस्वति शुतुद्रि' या वाक्यात संबोधनाची सर्व पदांची 'एकश्रुति' आहे. म्हणजे हे वाक्य म्हणताना त्या शब्दावर कोणताही आघात न देता त्या शब्दांचे उच्चारण करावयाचे. स्वरित हा उदात्त व अनुदात्तांचे मिश्रण आहे असे सांगितले खरे पण ते खरोखरी मिश्रण ( Mixture ) नव्हे तर त्याचा काही भाग उदात्त व काही अनुदात्त असतो व हा भाग किती प्रमाणात असतो हे वर सांगितलेच आहे. हे स्वरांचे सामान्य ज्ञान झाले. त्यांत अनेक बारकावे आहेत. भट्टोजी दीक्षिताने त्यांचे स्थूल पृथक्करण स्वरप्रक्रिया प्रकरणात केले आहे ते येणेप्रमाणे– प्रारंभी 'साधारणस्वर' या शीर्षकाखाली काही ठोकळ नियम दिले आहेत. उदाहरणार्थ, 'अनुदात्तं पदमेकवर्जम्'। ६।१।१५८ हे स्वरविषयक परिभाषासूत्र आहे. त्याचा










अर्थ असा की ज्या पदात उदात्ताचे किंवा स्वरिताचे विधान केले असेल त्यातील तेवढा वर्ण वर्ज करून इतर सर्व वर्ण अनुदात्त समजावेत. किंवा 'उदात्तानुदात्तस्य स्वरितः'। ८।४।६६ याने उदात्तापुढे अनुदात्त आल्यास तो स्वरित होतो. यानंतर धातुस्वर दिले आहेत. उदाहरणार्थ, 'धातोः'। ६।१।१६२ याने धातूना अंत्यस्वर नेहमी उदात्त असतो असे सांगितले आहे. पुढे प्रत्ययस्वर दिले आहेत. सामान्यतः प्रत्यय-स्वर आद्युदात्त असतो असे 'आद्युदात्तश्च'। ३।१।३ यात म्हटले आहे. पुढे प्रातिपदिकस्वर, समासस्वर, (याविषयीची सूत्रसंख्या सर्वात अधिक आहे.) तिङन्तस्वर असे क्रमाने दिले आहेत.

शांतनवाचार्यांची ८८ 'फिट्' सूत्रे आहेत हे मागे सांगितलेच आहे. आता पाणिनीने प्रातिपदिकांचे स्वर सांगितल्यावर पुनः या 'फिट्' सूत्रांची आवश्यकता काय? कारण 'फिष्' ही प्रातिपदिकाचीच पूर्वाचार्यांची संज्ञा आहे. यावर समाधान असे की फिष् आणि प्राति-पदिक यात बारीक फरक आहे. तो कोणता? व्याकरण-शास्त्रात व्युत्पत्तिपक्ष आणि अव्युत्पत्तिपक्ष असे दोन पक्ष आहेत. प्रत्येक शब्द धातूपासूनच होतो असे शाकटायनाचे मत आहे. (पहा. 'नाम च धातुजमाह निरुक्ते शकटस्य तोकम्'। निरुक्त.) उलट मत गार्ग्याचे आहे. 'न सर्वाणीति गार्ग्यो वैयाकरणानां चैके.' पाणि-नीने आपले स्पष्ट मत दिलेले नाही पण उणादिसूत्रांनी साधलेली प्रातिपदिके अव्युत्पन्न आहेत अशा अर्थाची 'उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि' परिभाषा आहे. पाणिनीने व्युत्पन्न प्रातिपादिकांचे स्वर सांगितले तर शांतनवाने अव्युत्पन्नांचे सांगितले असे म्हणता येईल. शांतनव हा 'पाणिन्यपेक्षया अर्वाचीनः' असे नागेशाने 'प्रदीपोद्योतात' म्हटले आहे. फिट् सूत्रांतही 'छन्दसि' आणि 'भाषायाम्' असे प्रकार आहेतच.

## अनुबन्धामुळे स्वरभिन्नता

प्रातिपदिके साधते वेळी पाणिनीने त्यांचे स्वरांत भिन्नता दाखविण्यासाठी प्रत्ययांना अनुबन्ध लावले. उदाहरणार्थ, प्रत्ययातील इतर वर्ण जाऊन अकारच उरला तरी तो सांगण्यासाठी दहा प्रकारचे प्रत्यय सांगितले. उदाहरणार्थ, ण, अण्, अञ्, अप्, क, अङ्, घञ्, अट् वगैरे. या सर्वांत 'अ' उरतो. स्त्रीलिंगीरूप तयार करण्याकरता आ व ई प्रत्यय असील तरी ते टाप्, डाप्, चाप् किंवा ङीप्, ङीष्, ङीन् इत्यादि सानुबन्ध सांगितले. हेतु हा की 'स्वरे भेदः'. स्वरात भेद दाखविता यावा म्हणून. कृदन्त व तद्धितान्त रूपे तयार करताना पाणिनीने अशीच सानुबन्ध प्रत्ययांची योजना केली आहे ती विस्तारभयास्तव येथे देता येत नाही. अनुबन्धाने स्वराशिवाय इतरही कार्ये होतात.

## स्वरांचे इतर गुणधर्म

स्वर हे मुखातील ताल्वादि स्थानांच्या भिन्न भिन्न भागांना जिभेचा स्पर्श झाल्याने उदात्तादि भिन्न असतात हे वर सांगितले. त्याप्रमाणे त्यांचे गुणधर्मही भिन्न आहेत. उदात्त स्वर मुखातून काढताना शरीरातील अवयवांचा आयाम म्हणजे दीर्घता, स्वराचा रुक्षपणा, कंठातील मोकळया भागाचा संकोच या गोष्टी प्रत्यक्षात होतात असे पतंजलीने महाभाष्यात म्हटले आहे. उलट, अनुदात्ताचा उच्चार करताना शरीरातील अवयवांचा शिथिलपणा, मार्दव म्हणजे स्वराचा कोमल-पणा आणि उरुता म्हणजे कंठातील मोकळया भागाचा विकास या गोष्टी प्रत्यक्षात होतात. (पहा– 'आयामो दारुण्यमणुता स्वस्येत्युच्चैः कराणि शब्दस्य'। म. भा. वेदाचे जेव्हा सस्वर पठन वैदिक करतात तेव्हां वरील सर्व प्रकारच्या स्वरांचा वर सांगितल्याप्रमाणे आविष्कार झालेला प्रत्ययाला येत नाही. स्वरांतील बारकावे तर राहूच द्या पण उदात्त, अनुदात्त स्वरहि मुखातून काढताना त्यांच्या अंगी असलेल्या गुणांचा प्रत्यय त्यांना स्वतःलाही येत नाही! काही स्वर मुखातून काढणे अशक्य असल्याने ते हाताच्या भिन्न भिन्न चलनवलनाने दाखवितात. पाणिनिकाली या स्वरांचा आविष्कार प्रत्यक्ष मुखातून होत असला पाहिजे पण कालांतराने तो लुप्त झाला असावा.

## स्वरांचा आविष्कार

मुखातील ही ताल्वादि स्थाने स्पष्ट व्हावीत म्हणून सन १८७१ साली **'जे ओक्ले कोलस'** नावाच्या इंग्रजाने (Phonotic Accuracy) उच्चारातील सूक्ष्मतेचा प्रत्यय यावा म्हणून मुखातील वरचा भाग (the roof of the mouth) रंगविला पण त्याला ते साधले नाही. आजही ते प्रत्यक्षात नाही. ॲलन म्हणतो– 'Even today the precise mechanism of pitch variation is a difficult and debated topic.'



अनुक्रमणिका






( Ancient Phonetics in India ) पुणे येथील डेक्कन कॉलेजात या स्वरांच्या बारकाव्यातील आविष्कार व्हावा म्हणून यंत्राच्या साहाय्याने प्रयत्न चालू आहेत असे ऐकतो. श्री. बालसुब्रह्मण्यम् व डॉ. शंकरन् हे या प्रयत्नात आहेत. प्रत्यक्ष यश किती हे समजले नाही. आणखी एक शंका–वर्णांचा उच्चार व ध्वनि लक्षात घेऊन प्रातिशाख्यकारांनी त्यांचे दोन भाग कल्पिले आहेत. एक ' आभ्यंतर ' प्रयत्न म्हणजे मुखातला व दुसरा ' बाह्य ' प्रयत्न म्हणजे मुखाबाहेरचा. मुखाबाहेर म्हणजे बाहेर हवेत नाही. ' काकलक ' म्हणजे कंठमण्यापासून तो ओष्ठापावेतोच्या भागाला मुखातील ' आभ्यन्तरप्रयत्न ' म्हणतात व कंठमण्यापासून खाली नाभिप्रदेशापावेतोच्या भागाला ' बाह्य प्रयत्न ' म्हणतात. उदात्त, अनुदात्तादि स्वरांचा समावेश प्रातिशाख्य व शिक्षाग्रंथकारांनी बाह्यप्रयत्नांत केला आहे. आता असा प्रश्न येतो की मुखातील ताल्वादिस्थानांना जिभेचा स्पर्श झाल्यावर हे स्वर निष्पन्न होतात तर ते ' बाह्य ' कसे ? त्यावर असे समाधान करता येईल की हे उच्चारण होण्यासाठी ज्या वायूचा त्या स्थानांना स्पर्श होतो तो नाभिप्रदेशातून येत असल्याने तो बाह्यच आहे. पण मग इतर वर्णांच्या बाबतीतही तसे म्हणता येईल. तात्पर्य, हे कोडे नीटसे उलगडले नाही.[२]

## स्वरचिन्हे

आता वेदवाङ्मय लिपिबद्ध झाल्याने ते सस्वर मुद्रित झाले आहे. त्यातील चिन्हे सामान्य माणसाच्या लक्षात येत नाहीत. अनुदात्ताखाली आडवी रेघ – दिलेली. तर स्वरितावर उभी असते. उदात्तासाठी चिन्ह नाही त्याप्रमाणे उदात्तापुढे अनुदात्त आला असता जो स्वरित होतो त्यालाही चिन्ह नसते. ते ' जात्य ' स्वरितालाच असते. पाश्चात्त्य विद्वान मात्र उदात्त स्वर दाखविण्यासाठी ' असे बारीक चिन्ह करतात.

अलीकडे पाश्चात्त्य व पौर्वात्य पंडितांनी ( Scholars ) वेदांचे संशोधन चालविले आहे. त्यावर संशोधन करून अनेकांनी ' डॉक्टोरेट ' मिळविली आहे. भारतातही असे डॉक्टर्स अनेक आहेत पण स्वरविषयक संशोधन करून व त्यांचा आविष्कार कसा होतो हे प्रत्यक्षात दाखवून पदवी मिळविलेला पदवीधर माझ्यातरी ऐकण्यात नाही.[३] भाषेतील स्वर लुप्त झाले तसे ते वेदातीलही होण्याचा संभव आहे व तसे झाल्यास फार मोठी हानी आहे. सस्वर वेद म्हणण्याची प्रथा आमच्या वैदिकांनी अजून ठेवली आहे म्हणून आशेला जागा आहे इतकेच.[४] केवळ शास्त्रीय चर्चेने ( Academic discussion ) कार्यभाग होणार नाही. वेदातील वर्णांचे जेथे नीट उच्चारच करता येत नाही तेथे ते सस्वर म्हणणे दूरच राहिले ! गुरुमुखाशिवाय पोथीवरून केवळ सस्वर वेदपठन करणे अशक्यप्राय आहे, इत्यलम् ।

## संदर्भग्रंथ—

(१) पतंजलीचे महाभाष्य.
(२) ' Ancient Indian Phonetics ' by W. S. Allen.
(३) काशिका– (जयादित्य-वामन)
(४) वैयाकरणसिद्धान्तकौमुदी ( भट्टोजि दीक्षित )
(५) व्याकरणमहाभाष्याचा उपोद्घात– ( प्रा. का. वा. अभ्यंकर )
(६) ' Phit Sutras of Shantanava ' by Dr. G. V. Devasthali.

---

२. ' अग्निः ' यातील इकार उदात्त आहे. इकार तालुस्थानचा तर ' उदात्त ' कंठमण्याच्या खालच्या वायूच्या आघाताने होतो.

३. पुण्यातील ' प्रगत संस्कृत केंद्रात ' श्री. बालसुब्रह्मण्यम् हे पाणिनिसूत्रावरून वेदातील स्वर व अर्थ तपासून पाहत आहेत असे कळते.

४. पाणिनिसूत्रावरून वेदस्वर तपासणे हे कित्येकांना मान्य नाही. त्यांच्या मते पाणिनि चुकला असेल ! उदाहरणार्थ, ' अवपथासि च ' । ६।१।१२१ हे सूत्र संहितेवरून ' अपवथासि च ' असे पाहिजे असे आचार्य वि. प्र. लिमये यांचे संशोधन आहे.

प्रा. म. शं. वाबगावकर

# पवनार येथील एक अप्रकाशित शिलालेख

पवनार हे गाव नागपूर-वर्धा मोटारमार्गावर नागपूरपासून चाळीस मैलावर आहे. तेथे श्री. विठ्ठल चिमणाजी बांगडे यांच्या गोठ्याच्या पूर्वद्वाराला एका शिलालेखाचा दगड बसविला आहे. प्रा. दे. गं. सोटे यांनी तो प्रसिद्ध केला. इ. स. सोळाशेमधील अहमदनगरच्या बुऱ्हाण निजामशहाचा तो लेख आहे. शिवाय कुराणातील वचने कोरलेला कबरीवरील लेखाचा एक दगड गावात आहे. याशिवाय चवदाव्या शतकातील एक महत्त्वाचा जैन शिलालेख आपण पवनारला १९४३ साली पाहिल्याचे मुनि कांतिसागर सांगतात.[१] भट्टारक पद्मनाभ यांचा उल्लेख या लेखात आहे. १९५१ साली कांतिसागर पुनः गेले तेव्हा कोणाच्या तरी घराच्या भिंतीला तो लेख लावला गेल्याचे त्यांना कळले. पण त्याची प्रतिलिपि आपणापाशी सुरक्षित असल्याचे मुनिजींनी लिहिले आहे.[२] त्यावरून आम्ही मुनिजींशी पत्रव्यवहार केला. पण आता ती प्रतिलिपीही दुष्प्राप्य असल्याचे त्यांनी कळविले ! त्या मूळ लेखाचा पवनारमध्येही शोध लागू शकला नाही. अजूनही आणखी शोध करावयास हवा. ह्या सर्व लेखाहून भिन्न असा एक संस्कृत शिलालेख गावच्या दक्षिणेला जे महाद्वार आहे त्यात जमिनीपासून २ मीटर व तीस सेंटिमीटर उंचीवर लाविलेला आहे. त्याचा विचार येथे करावयाचा आहे. पवनार हे गाव सुमारे गेल्या तीन हजार वर्षांइतके प्राचीन आहे. ते वाकाटकांची राजधानी प्रवरपुर असावे हे मत टी. ए. वेलस्टेड यांनी मांडले.[३] रा. ब. का. ना. दीक्षित यांनी ते संमत केले व प्रथम प्रवरसेनाची ही राजधानी असे म्हटले.[४] पवनारला बिनोबाजींच्या आश्रमाचे काम चालू असताना सापडलेल्या सुंदर मूर्तींवर "पोतदार गौरव ग्रंथां"त लेख लिहून डॉ. वा. वि. मिराशी ह्यांनी या मताला पुष्टि दिली. त्यांच्या मते ही द्वितीय प्रवरसेनाची राजधानी असून त्याने आपली माता प्रभावती गुप्ता हिच्यासाठी बांधलेल्या सुंदर, उत्तुंग देवळाचे हे अवशेष व त्यातील ही शिल्पे होत.[५] नुकतेच पवनारला नागपूर विद्यापीठाच्या वतीने उत्खनन करण्यात आले. तेथील किल्ल्याची जागा सर्वांत उंच व लोकांकडून फारसा उपद्रव, विक्षेप तेथे झालेला नसल्याने तेथील अवशेष यथावत्, अविकृत स्थितीत सापडू शकतात; म्हणून उत्खननासाठी किल्ल्यातील जागेची निवड केली. तेथे २३ फूट खोल खळगा खणला. शेवटी तळाशी काळ्या मातीचा, ब्लॅक् सॉईल्चा थर लागला. त्यातही दोन फूट खोल आणखी खणले. पण त्या थरात कोणतेच अवशेष सापडले नाहीत. त्याअर्थी तेथे गहन जंगल होते ते कापून या काळ्या मातीच्या थरावर मूळ वसाहत झाली असली

१ खण्डहरोंका वैभव– मुनि कांतिसागर, पा. १५

२ तत्रैव, पा. १६६

3 T. A. Wellsted– "Notes on the Vakatakas of the C. P. & Berar, and Their Country, 4th to 8th Cent. A. D."– J. A. S. B. XXIX, 1933 p. 159, fn 2.

४ तत्रैव.

५ प्राचीन महाराष्ट्राचा धार्मिक इतिहास– प्रा. र. म. भुसारी. या ग्रंथाला असलेला मिराशींचा पुरस्कार. तेथे पृष्ठक्रमांक दिलेले नाहीत ! अथवा Studies in Indology – Dr V. V. Mirashi, Vol. II, Nagpur, 1961. pp. 272 ff.










## पवनार येथील एक अप्रकाशित शिलालेख

पाहिजे. या उत्खननावरून पवनार येथील मानवी संस्कृतीच्या वसाहतकालाचे व उत्कर्षापकर्षाचे एकूण चार कालखंड कल्पिता येतात. यातील सर्वात खालचा थर इ. स. पूर्व एक हजार ते इ. स. पूर्व पाचशे या सगळचात जुन्या पहिल्या कालखंडाचा होय. या काळातील बाहेरून लाल व आतून काळी अशी पातळ व नक्षीदार फार जुनी मातीची भांडी सापडली. लोखंड वा अन्य तत्सम धातूचा उपयोग या काळातील निवासी करीत नसावे. त्यांच्या गोल शेगडचांच्या खुणा व घराच्या सपाट गुळगुळीत जमिनी ओळखू येतात. यापुढील कालखंड दोन अ हा इ. स. पूर्व पाचशे ते इ. स पूर्व शंभर वर्षे हा होय. या काळात ही माणसे लोखंडाचा वापर सुऱ्या, बाण, कोयते इ. स्वरूपात करीत असत असे दिसते. तांबे, ब्राँझ् इ. अन्य धातूंच्या वापराच्या खुणाही अधिक उत्खनन केल्यास मिळू शकतील. मानवी सांगाडा मात्र उत्खननात सापडला नाही. अर्थात हे लहान प्रमाणावरील उत्खनन होते. पवनारला धाम नदीच्या दोन्ही काठांवर उत्खननयोग्य स्थळे बहुत आहेत. व्यापक प्रमाणावर अधिक उत्खनन केल्यास सांगाडचांचे अवशेषही सापडू शकतील. आधीच्या काळातील पातळ बारीक पॉटरीऐवजी या काळात जाड काळी व लाल मृत्तिकापात्रे मिळतात. त्यांच्या सांडपाण्याच्या व्यवस्थेची प्रचंड मृत्तिकावलये ( ह्यूज् अर्दन रिंग्ज् ) मिळतात. पूर्वसातवाहनकालीन नाणी मिळतात. या काळातील लोकांची घरे कौलारू असून त्यांना लाकडी स्तंभ असत. एकात एक कौले फसवून ती खिळचांनी लाकडी चौकटीत बसवीत. यापुढील कालखंड दोन ब हा इ. स. पूर्व शंभर ते इ. स. तीनशेचा काळ होय. या काळी पवनारच्या लोकांचा रोमशी संबंध असावा. रोमशी असणाऱ्या त्यांच्या दळणवळणाची निदर्शक अशी खुजा, झारी इ. रोमन बनावटीची भांडी सापडली आहेत. रोमन अँपोरा म्हणजे ज्यातून दारू याव-याची अशा रोमन भांडचांचे २ अवशेष आढळले. हे अवशेष कमी मिळण्याचे कारण ते येथे तयार केले जात नसून रोमहून आयात केले जात असत. त्यांना बाहेरून लाल पॉलिश केलेले आहे. या काळातील मणि, शंखाच्या बांगडचा, काचेच्या बांगडचा, कौलांची घरे इत्यादींच्या अवशेषांवरून या काळात हे गाव फार भरभराटीच्या, समृद्धीच्या युगात होते असे दिसते. यापुढील कालखंड तिसरा इसवी सन तीनशे ते इसवी सन आठशे हाच गुप्तवाकाटक काल म्हणजे पवनारच्या इतिहासातील सुवर्ण युग होय. या कालातील वज्रघंटा घेतलेला मोठचा मूर्तीचा एक खंडित हात व दोन सुंदर गणेशमूर्ति उत्खननात मिळाल्या. त्यातील एक तर भूमरा येथील उत्तर-गुप्तकालीन सुप्रसिद्ध गणेशमूर्तीच्या पद्धतीची आहे. विनोबांना आश्रमासाठी जमीन खोदताना सापडलेली गंगाभगवती, वालिवध, भरतभेट, शिवाची अंधकासुर वधमूर्ती इत्यादी प्रचंड, भव्य व सुंदर शिल्पे याच काळातील होत. त्यातील गंगा, तिचे वाहन जे मकर त्यावर उभी आहे व या मूर्तीवर ५व्या ६व्या शतकातील लिपीमध्ये " गंगाभगवती " अशी अक्षरे कोरलेली आहेत. तिच्या आभूषणांची सूक्ष्मता तिच्या मुद्रेवरील दैवी प्रेममयतेचा जिवंत भाव इ. शिल्पाकृतीचे समग्र सौंदर्य शब्दांनी वर्णन करण्यापलीकडचे आहे. ह्या आश्रमाखाली गुप्त-वाकाटक कालीन एखाद्या अतिभव्य मंदिराचा पाया निश्चित असावा. या काळातील शंखाच्या सुरेख बांगडचा, उत्तर सातवाहन कालीन नाणी तसेच विष्णुकुंडी वंशाची नाणी सापडली. यापुढील चवथा म्हणजे शेवटचा कालखंड इ. स. चे आठवे शतक ते पंधरावे– सोळावे शतक हा होय. या काळांतील पोर्सेलिन्ची भांडी व त्यावर निळचा रंगाची पेंटिंग्ज् मिळाली.

इ. स. च्या अकराव्या बाराव्या शतकापासून पवनारवर मुस्लिम आक्रमणे झाली. व पवनारच्या ऱ्हासयुगाला प्रारंभ झाला. पवनारला किल्ल्यात ज्यांची कबर आहे ते सय्यद अहमद कबीर रहमतउल्ला हे बिनशिराचे पवनारला आले होते व तेथील शेवटच्या हिंदु राजपुरुषाचा नाश करून व किल्ल्यातील हिंदु देवळांचा विध्वंस करून मुसलमानांची सत्ता त्यांनी तेथे स्थापिली असे सांगतात. अजमेर येथील प्रसिद्ध मोइनुद्दीन चिश्ती यांचा उरूस जेव्हा होतो त्याचवेळी ह्या सय्यद साहेबांचा पवनारचा उरूस होतो. सोमनाथ फोडणाऱ्या मह-












मद गझनवीचे भाचे (ह्याविषयी माहिती देणारा हैद्राबादेहून १८६० साली प्रसिद्ध झालेला "तारीख इ अमजदी" हा फार महत्त्वाचा ग्रंथ आहे. त्याचे वऱ्हाडच्या मुस्लिम इतिहासाचा साधनग्रंथ म्हणून अनन्यसाधारण महत्त्व आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळाने त्याचे मराठीत तावडतोब भाषांतर करवून ते प्रसिद्ध करणे अत्यावश्यक आहे.) शाह अब्दुर रहमान गाजी जे बिनशिराचे लढले व ज्यांनी अचलपुर (हल्लीचे एलिचपूर) च्या जैनधर्मीय इल राजाला मारले ते व हे पवनारचे किल्ल्यातील बिनशिराचे सय्यद अहमद कबीर रहमतउल्ला हे समकालीन होत. अब्दुर रहमान गाजी व ईलराजा यांची लढाई इ. स. दहाशे अठ्ठावन (१०५८ इ. स.) मध्ये झाली होती.[६] म्हणजेच अकराव्या शतकाचा मध्यकाल हाच या पवनारच्या रहमतउल्लांचा काळ होय. पवनारच्या इतिहासाविषयी जनश्रुति अनेक आहेत. पण त्या सर्व येथे देण्याचे हे स्थळ नव्हे. मात्र पवनार, पोहणा व पवनी या तीनही गावांचा एकाच राजवंशाशी अथवा राजपुरुषाशी संबंध जनमानसात परंपरेने चालत आलेला आहे ही गोष्ट नमूद केली पाहिजे. विशेषतः पोहणा येथील किल्यात पवनारप्रमाणेच उत्खनन होणे फारच आवश्यक आहे. या ऱ्हासयुगातील घरांची रचना सुनियोजित दिसत नाही. या काळातील मुस्लिम ग्लेज्ड् पॉटरी, तसेच ठिसूळ कोर्स पॉटरी उत्खननात मिळाली. मुस्लिम नाणीही मिळाली.

पहिल्या कालखंडातील घडा, दुसऱ्या कालखंडातील वाडगा, रोमशी दळणवळण दाखविणारी खुजा, झारी इ. भांडी यांच्याबरोबरच तक्षशिलेला सापडली आहेत. तसेच भांड्याला लाविलेले सिंहाचे मातीचे मुख उत्खननात सापडले. अथवा हस्तिदंताची आरशाची मूठ व तिच्यावर बसविलेला सिंह सापडला. शिवाय ज्याला दोन बाजूंना दोन छिद्रे असतात व त्यात आडवा खुंटा असतो, ज्याचे मुख हल्लीच्या जात्यापेक्षा उंच असते व जे दोन बायांनी एकाच वेळी अर्धे अर्धे फिरवावयाचे असते असे प्राचीन (रोमन) जातेही उत्खननात सापडले. अगदी वरच्या थरात म्हणजे भूपृष्ठापासून फक्त एक फूट खोलीवर एक नऊ इंच लांबीची, उभी, चतुर्भुज विष्णुमूर्ती सापडली. मात्र प्रवरपुर हेच पवनार होय असे निःसंदिग्धपणे सिद्ध करणारा कोणताही निश्चित पुरावा या उत्खननात सापडला नाही. फक्त गुप्तवाकाटक काळ हा पवनार येथील लोकजीवनातील सर्वाधिक सांस्कृतिक समृद्धीचा उत्कर्षकाळ होता एवढे दिसून आले. शिवाय वाकाटकांच्या ताम्रपटात प्रवरपुर ही राजधानी होती असे कुठेच म्हटलेले नाही. 'प्रवरपुरात्' म्हणजे ताम्रपट जेथून दिला गेला ते स्थळ प्रवरपुर होते एवढाच अर्थ आहे. शिवाय व्युत्पत्तिप्रमाणे प्रवरपुर पासून पवनार हे रूप सिद्ध होणार नाही. ते प्रवरनगर पासून होईल. व वाकाटक ग्रँटस्‌मध्ये तर प्रवरनगर नसून प्रवरपुर असा निर्देश आहे! हे पवनारचे प्राचीन निवासी खात काय असत? इ. स. पूर्व दुसऱ्या शतकापासून पवनारला तांदूळ होई असे दिसते. तो ते खात असावेत. कारण तांदुळाच्या धान्याच्या आकारांच्या खुणा विटांवर व कौलांवर उत्खननात आढळल्या. पवनार येथील श्री. रतन मांग ह्यांना तेथील जुने अवशेष गोळा करण्याचा छंद आहे. त्यांना तेथे सांपडलेले मातीचे एक पुरातन सील नागपूर विद्यापीठाचे कुलगुरु डॉ. कोलते ह्यांनी ५ रु. मूल्य देऊन घेतले. त्यावर 'नम परमसर' (नमः परमेश्वरायचे अपभ्रष्ट रूप) अशी अक्षरे स्पष्ट दिसतात. प्रस्तुत शिलालेखाचे वाचन करण्याचे कामी डॉ. य. खु. देशपांडे ह्यांनी आम्हांस जे मार्गदर्शन केले त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोत. हा शिलालेख फुटलेला आहे व जेवढा भाग कायम आहे त्याच्यातही दोन टोकांना जोडणाऱ्या कर्णरेषेतील भाग फुटलेला आहे. त्याची भाषा अशुद्ध संस्कृत दिसते.

शिरोरेषेसहित शिलालेखाच्या एकूण आठ ओळी आहेत. वरच्या नमनपर शिरोरेषेची ओळ लहान व तिच्यातील अक्षरेही लहान असून पुढच्या सात ओळीतील अक्षरे सारखी आहेत. टोकापासून दहा मिलीमीटर एवढे अंतर सोडून शिरोरेषा सुरू होते. समग्र शिलालेखाच्या ती मधोमध असावी, म्हणजे शिरोरेषेतील अक्षरे संपल्यानंतर त्या पुढचा

६. यादवकालीन महाराष्ट्र– डॉ. मु. ग. पानसे, पा. १४६,








भाग १० मिलीमीटर असला पाहिजे. या हिशेबाने मूळ संपूर्ण शिलालेखाचा लिहिलेला भाग एकूण अठ्ठावीस मिलीमीटर लांब व अठ्ठावीस मिलीमीटर रुंद असा दिसतो. त्यापैकी उपलब्ध लेखातील लिहिलेला भाग सव्वीस मिलीमीटर लांब व सव्वीस मिलीमीटर रुंद इतका आहे. म्हणजे फुटून गेलेला भाग फार नाही. शिलालेखाची लिपी देवनागरी आहे. त्याच्या लेखनपद्धतीचा एक विशेष असा आहे की आधी सरळ संपूर्ण रेघ कोरून मग तिच्यावर मागाहुन अक्षरे कोरलेली दिसतात. कवि डिंभमुनि कृष्णदासकृत "श्रीकृष्णजन्माष्टमीव्रताख्यान" ह्या नावाची एक महानुभावीय पोथी प्रा. व. दा. कुलकर्णी ह्यांनी संपादिलेली नुकतीच प्रसिद्ध झाली आहे. मूळ पोथीच्या पानाचा फोटो त्या ग्रंथात छापला आहे. त्यावरून पाहता त्या पोथीतील लेखनपद्धती व ह्या शिलालेखातील लेखनपद्धती ह्या दोहोत फार साम्य दिसते. त्या पोथीतही आधी सरळ रेघ काढून मग तिच्यावर अक्षरे लिहिलेली आहेत. शिवाय या शिलालेखातील "ष्ण" व त्या पोथीच्या पानाच्या फोटोतील "ष्ण" अगदी सारखे आहेत. त्या पोथीच्या हस्तलिखिताचा लेखनकाल शके १६८२ म्हणजे इसवीसन सतराशे साठ असा त्या हस्तलिखितात दिलेला आहे. त्याच्याही निदान शंभर वर्षे आधी ही लिपिपद्धती असावी. याप्रमाणे पाहता हा शिलालेख सुमारे तीनशे वर्षांपूर्वीचा दिसतो. हा काळ थोडा आगेमागे होऊ शकेल. तो तर्काने बसविला आहे. कारण कालाचा प्रत्यक्ष निर्देश उपलब्ध शिलालेखात नाही. शिलालेखात शिरोरेषेतील 'विष्णु' चा 'वि' दीर्घ काढला आहे! ओळ चवथी व पाचवी ह्यावरील अक्षरे मुळात आहेत. पण ती आम्हास शिलालेखाच्या फुटकेपणामुळे नीट लागली नाहीत. शिलालेखाचे संभाव्य वाचन पुढीलप्रमाणे आहे :—

ॐ वीष्णुपा (दाम्यांत) मः १
खेडि निवसिते शंक (र...) र २
चिते देवाळये वास्तु भू... ३
४
५
श्रीमधुदधि उदक पुष्प... ६
वन्दन प्रतिष्ठार्चने वाळ (ो)... ७
तनय (?) धामतिरे पवेग्रामम (ध्ये)... ८

खेडि येथे राहणाऱ्या (अथवा खेड येथे) कोणा शंकराने अथवा कदाचित् त्याचा पुत्र असलेल्या कोणा बाळोजीने (सातव्या ओळीत 'वाळ' शब्दानंतर फुटले आहे, ते वाळोजी असू शकेल) धाम नदीच्या काठी देऊळ बांधून त्याची वास्तूपूजा केली व मूर्तिस्थापना करून दधिमधु इ. सामग्रीने वंदन प्रतिष्ठार्चन त्याने केले. स्थापना कोणत्या देवतेची केली ते उपलब्ध शिलालेखात वाचता येत नाही. परंतु ज्या अर्थी पहिल्याच शिरोरेषेत लेखाच्या आरंभी "ॐ वीष्णुपा (दाम्यांत ही मधली अक्षरे फुटली) मः" असे विष्णूला वंदन केले आहे त्याअर्थी नदीकाठी देवळामध्ये विष्णुमूर्तीची प्रतिष्ठा केली असली पाहिजे. पूर्ण मनुष्याकृतीहूनही मोठी अशी श्री शेषशायी विष्णूची एक अतिभव्य प्राचीन मूर्ती किंबहुना शिल्पपट आजही पवनारला विनोबाजींच्या आश्रमाच्या जवळच रामभरतमंदिराच्या बाजूला नदीकाठी आहे. त्यात शेषावर निजलेले विष्णु, त्यांच्या नाभीतून निघालेले कमल, त्यांचे चरणसंवाहन करीत बसलेली लक्ष्मी, बाजूला गरुड व नारद अथवा तुंबरु हे सर्व एकत्र कोरलेला तो प्राचीन शिल्पपट आहे. त्याच्याभोवती आज दिसणारे देऊळ हे अलीकडे बांधलेले, आधुनिक आहे. पण मूलतः त्या ठिकाणी गुप्तवाकाटक काळात भव्यमंदिर निश्चित् असले पाहिजे. अकराव्या शतकातील पहिल्या मुसलमानी आक्रमणाच्या सपाटचात त्याचा विध्वंस केला गेला असेल. ती मूर्ती तेथेच जमिनीत पडून राहिली अथवा तिचे रक्षण व्हावे म्हणून पुरून ठेवली. कालांतराने सुमारे तीनशे साडेतीनशे वर्षांपूर्वी पुनः तेथे देऊळ उभारले गेले व मूर्तीची प्रतिष्ठा करण्यात आली त्यावेळचा हा शिलालेख दिसतो. कदाचित् अहमदनगरचा बुऱ्हाणनिजामशहा तेथे आला असताना (कारण त्याचा शिलालेख पवनारला उपलब्ध आहे) तेही देऊळ पुनः पडले अथवा पाडले गेले व शिलालेखही फोडण्यात आला व तो पडून राहिला असे दिसते. आज जरी तो परकोटाच्या दक्षिणेकडील दरवाजात बसवि-










लेला दिसत असला तरी मुळात तो तेथे नव्हता हे जुने गावकरीच सांगतात. काही वर्षांपूर्वी हे महाद्वार खचले असतांना पवनारच्या तत्का-लीन देशमुखांनी ते पुनः बांधले व त्यावेळी पवनारमध्येच पण इतरत्र कोठे पडलेला हा शिलालेखाचा फुटका दगड आणून ह्या दरवाजात जमिनीपासून दोन मीटर व तीस सेंटिमीटर उंचीवर बसविला अशी माहिती जुने वृद्ध माहितगार गाव-करी सांगतात. त्याअर्थी नदीकाठच्या जुन्या विष्णु-मंदिराचाच हा शिलालेख मुळात असला पाहिजे. शेवटच्या ओळीत पवनारचे 'पवेग्राम' असे संस्कृती-करण (पवे ग्रामम पुढे ध्ये असावा तो फुटला) केलेले आहे ते लक्षणीय आहे. उत्खननातही किल्ल्यात भूपृष्ठापासून एक फूट खोलीवर एक नऊ इंच लांबीची, उभी, चतुर्भुज विष्णुमूर्ती सापडल्याचे वर सांगितले आहेच. मात्र उत्खननाच्या खळग्यात देवळाचे वगैरे अवशेष अर्थात्च सापडले नाहीत व ही उभी मूर्तीही वरीच उत्तरकालीन आहे. लेखाचा राहिलेला फुटका भाग पवनारमध्ये पुढे मागे सांपडला तर संपूर्ण लेखाचे वाचन अधिक बिनचूक करता येईल.

---

प्रा. गो. ग. कुलकर्णी

# भाषिक समस्या : एक अभ्यास

स्वातंत्र्योत्तर काळात लोकशाही समाजवादी समाज पुनर्घटना करताना भारतीयांना ज्या विविध समस्यांशी तोंड द्यावे लागत आहे त्यामध्ये भाषिक समस्या महत्त्वपूर्ण परंतु जटिल अशी ठरलेली आहे. वास्तविक अन्न, संरक्षण, लोकसंख्यावाढ यासारख्या भीषण, जीवनमरणाच्या समस्यांच्या तुलनेने भाषेसंबंधीची ही समस्या गौणच ठरावी. परंतु राज्यपुनर्रचनेच्या प्रयत्नातून उद्‌भवलेल्या काही राज्यांच्या सीमेवरील प्रदेशाच्या ओढाताणीवरून आणि इंग्रजी-हिंदी शिक्षणाच्या आग्रहामुळे दक्षिणेत झालेल्या उद्रेकावरून ह्या समस्येची पाळेमुळे किती खोल गेलेली आहेत ते सहज प्रत्ययास येते. प्रचलित प्रगट होत असलेल्या उलटसुलट वादविवादावरून तर असे वाटते की भाषिक प्रश्नांची गुंतागुंत अधिकच वाढत चालली आहे. दुर्दैव हे की हा भाषाशिक्षणाचा प्रश्न हाताळला जात असताना अखिल भारतीय पातळीची व्यापक राष्ट्रीय भूमिका, लोकशाही परंपरा आणि पायंडे निर्माण करून लोकशाही जीवनसरणी येथे रुजवावयाची आहे याची दृढ जाणीव, भारतीय संस्कृती आणि लोकस्वभाव याचा इतिहासज्ञानातून व डोळस भारतसंचारातून परिपक्व झालेला सुजाण समज, येणाऱ्या भविष्यकालात उभारल्या जाणाऱ्या ऐहिक समृद्धीने संपन्न अशा भारतीय समाजाच्या घडणीत विविध भाषांच्या सहभागासंबंधीचा विज्ञाननिष्ठ दृष्टिकोण याचे प्रत्यंतर येण्याऐवजी दिवसेदिवस राजकारणी डावपेच, शैक्षणिक दृष्टीतील कमालीची संकुचितता, प्रादेशिक भाषेसंबंधी अहंकार आणि त्यातूनच उद्‌भवणारा इतर भाषेबाबतचा आकस, राष्ट्रीय ऐक्य टिकविण्यासाठी म्हणून एखादी विशिष्ट भाषा सर्वदूर आवश्यक करू पाहणारा आततायी दुराग्रह यासारख्या लोकशाहीशी सर्वस्वी विसंगत वृत्तीप्रवृत्तीचा अराजक निर्माण करणारा नंगानाचच आपणास दृष्टोत्पत्तीस येतो. अशा परिस्थितीत केवळ ह्या समस्येचीच सोडवणूक होऊ शकणार नाही एवढेच नव्हे तर राष्ट्रीय भवितव्यच धोक्यात येण्याचा दाट संभव आहे.

भाषा-समस्या हाताळताना, भाषिक ध्येय-धोरणे ठरविताना आपणास प्रथमतः न्या. रानडे यांच्या एका विचाराची स्मृती व्हावी. ते म्हणत, समाजसुधारकाला कोरी पाटी कधीही मिळत नसते. तर त्यावर लिहिलेले अर्धे वाक्य त्याला पूर्ण करायचे असते. भाषिक जीवनात नवव्यवस्थापन करू पाहणाऱ्याने प्रथमतः सद्यकालीन भारतीय जीवनपद्धती, विविध भाषांचे स्वरूप व त्यांचे जीवनातील स्थान, भाषासंबंधीची ध्येयधोरणे ठरविण्याचे मार्ग ह्याबद्दलची वस्तुस्थिती जाणून घेणे हे आवश्यक ठरते. अशा सद्यपरिस्थितीचे सूक्ष्म अवलोकन न करता, भाषिक जीवनाच्या या पार्श्वभूमीचे यथायोग्य आकलन न करता घेतले गेलेले निर्णय हे भाषाप्रश्नाची गुंतागुंत वाढविणारेच ठरतील, त्यातून गोंधळ आणि अराजकच निर्माण होण्याचा संभव अधिक असतो, राष्ट्राला अंती ते विघातकच ठरतात. म्हणून भाषाजीवनासंबंधीचे ' अर्धे लिहिलेले वाक्य' समजून घेणे, त्याचे मर्म जाणून घेणे हे आपले आद्य कर्तव्य होय.

## लोकशाही जीवनपद्धतीची दृढ जाणीव

इतर भारतीय समस्यांप्रमाणेच भाषिक समस्येला सामोरे जाताना आपण काही धारणा, काही विचारसरणी मनामध्ये निश्चितपणे बाळगल्या पाहिजेत. त्यातली पहिली गोष्ट म्हणजे आपण एक लोकशाही राष्ट्र आहोत आणि लोकशाही जीवनपद्धतीची जोपासना व विकास करण्याचा आपला दृढ निश्चय आहे ही होय. ही लोकशाही शासनव्यवस्था व जीवनसरणी आपणावर कोणी लादलेली नाही. तर बहुढंगी भारतीय जीवनाची खरीखुरी प्रगती याच मार्गाने होऊ शकेल अशी आपली मनोमन खात्री आहे. प्राचीन भारतीय इतिहास–परंपरेचे अवलोकन केले तर सर्वसमावेशकत्व








व परमतसहिष्णुता हे भारतीय जनमानसाचे महत्त्वपूर्ण घटक असल्याचे दिसून येते. आणि अर्वाचीन काळात रानडे, दादाभाई, टिळक, राजा राममोहन राय, टागोर, गांधी, नेहरू प्रभृती लोकनेत्यांच्या समाजप्रबोधनातून जनस्वभावात समता–स्वातंत्र्यानुकूलत्व निर्माण झाले आहे. म्हणून भारतामध्ये समाजवादाची प्रस्थापना करण्यासाठी शांततामय सहजीवनाचा पुरस्कार करणाऱ्या लोकशाही शासनव्यवस्थेचा आपण अंगीकार केला आहे. तेव्हा कोणतीही भारतीय समस्या सोडविताना ह्या लोकशाही जीवनसरणीच्या केंद्रीभूत विचारापासून आपले लक्ष विचलित होऊ देता कामा नये. लोकशाही पद्धती म्हणजे लोकसमूहाचे स्वयंशासन. व्यक्तीचा किंवा लोकसमूहाचा जीवनादर्शासंबंधीचा, जीवनविकासासंबंधीचा स्वयंविचार, तो कार्यान्वित करण्यासाठी सुयोग्य साधनमार्गाच्या निवडीबाबतचा स्वयंनिर्णय आणि त्यासाठी आवश्यक ते उत्स्फूर्त सहकार्य या गोष्टी लोकशाही जीवनसरणीमध्ये गृहीतच धरलेल्या आहेत. या दृष्टीने पाहिल्यास भाषाजीवनाच्या सर्व अंगांचे नियमन करण्याचा व्यक्तीचा, लोकसमूहाचा अधिकार अबाधित राहिला पाहिजे. परंतु गेल्या पंधरावीस वर्षांतील राजकारणाच्या वाटचालीकडे दृष्टिक्षेप टाकला तर असे दिसते की भारतीय लोकशाहीच्या जीवनात निकोप विकासाऐवजी विकृतीच निर्माण होऊ लागल्या आहेत. भाषासमस्येसंबंधी प्रगट होत असलेल्या उलटसुलट विचारसरणीकडे पाहून असे वाटते की वरवर लोकशाहीचा पुकारा करणारे राजकारणी लोकनेते हस्तीदंती मनोऱ्यात बसून भाषाविकाससंबंधीच्या ठोकळेबाज व ग्रांथिक कल्पनांचा आवेशाने पुरस्कार करीत आहेत. बहुसंख्यानिर्णयाने लोकव्यवहारातील विविध प्रश्नांची सोडवणूक करण्याच्या प्रघातामध्ये तत्त्वच्युति होऊन केवळ सांगाड्याची जपणूक करणारी लोकशाहीला विघातक अशी प्रवृत्ती बळावू लागली आहे. खरे म्हणजे व्यावहारिक सोयीसाठी बहुसंख्यानिर्णय स्थूलमानाने आपण मानत असलो तरी अल्पसंख्यांकांच्या जीवनसरणीचीही आपण योग्य बूज राखतो. नव्हे ती तशी राखली जाण्यातच लोकशाहीचे खरे मर्म आहे याची आपण जाणीव ठेवली पाहिजे. जीवनातील बहुतेक सर्व अंगांचे नियमन बहुसंख्यानिर्णयाने करू पाहणे हे व्यक्तिजीवनावरील, लोकसमूहाच्या जीवनावरील फार मोठे आक्रमण ठरेल. म्हणून एखाद्या प्रदेशाच्या किंवा लोकसमूहाच्या जीवनातील खाणेपिणे, वस्त्रेप्रावरणे, विवाह, सणसमारंभ, श्रद्धा-समज यासारख्या निरनिराळ्या अंगांचे नियमन आपण ज्याप्रमाणे बहुसंख्यानिर्णयाने करीत नाही त्याचप्रमाणे भाषिक विनिमयाच्या अंगाचे नियमनही बहुसंख्यानिर्णयाने करू नये. तो अधिकार सर्वस्वी त्या त्या प्रदेशाला किंवा लोकसमूहाला सुपूर्द करणे हेच अंती हितावह ठरेल. किती भाषा शिकाव्या–शिकवाव्यात, कोणत्या व किती भाषा आवश्यक कराव्यात, उच्च शिक्षणाचे माध्यम म्हणून कोणती भाषा असावी, कोणकोणत्या परकीय भाषा आवश्यक आहेत, विविध विज्ञानशाखा व तंत्रविद्या यांचे शिक्षण कोणत्या भाषेतून द्यावे, आंतरप्रांतीय संबंध व राष्ट्रीय ऐक्य याकरिता कोणत्या भाषांचे शिक्षण आवश्यक ठरते, विश्वनागरिकत्वाच्या प्राप्तीसाठी आणि भारताची प्रतिमा जगात सन्मानाची–प्रतिष्ठेची राहील यासाठी कोणत्या भाषांचा अभ्यास उपयुक्त ठरतो इत्यादी भाषासमस्येतील विविध दुव्यांच्या बाबतीत प्रदेशराज्याचा किंवा विशिष्ट लोकसमूहाचा स्वयंनिर्णय हाच खरोखरी निकोप लोकशाहीच्या विकासाला संजीवक ठरेल.

## राज्य हाच घटक का ?

प्रदेशराज्य हाच घटक केंद्रीभूत धरून भाषासंबंधीच्या सर्व ध्येयधोरणांची रूपरेषा आखावी, प्रादेशिक जीवनातील सर्व प्रकारच्या व सर्व पातळीवरील व्यवहाराचा विनिमय प्रादेशिक भाषातून व्हावा, सर्व ज्ञान-विज्ञान, कला-वाङ्मय यांचा परिचय व विकास लोकभाषेतून व्हावा, समग्र सांस्कृतिक जीवनाचीच प्रादेशिक भाषा ही वाहिनी असावी याचे कारण म्हणजे प्रचलित प्रदेशराज्यांची राजकीय स्थिती व त्यांच्या सांस्कृतिक जीवनाची जडण घडण. सामान्यतः भारत हे ' एक निशान, एक विधान, एक प्रधान ' असणारे स्वतंत्र, स्वायत्त व सार्वभौम राष्ट्र आहे असे आपण म्हणत असलो तरी खरेखुरे ते आपले एक ध्येयस्वप्न आहे. सर्व भरतखंड एका शासनाखाली असले, सर्व भारतीयांच्या राजकीय ध्येयाकांक्षा एक असल्यासारख्या वाटतात. तरी भारतीय जीवनाचे व इतिहासाचे सूक्ष्मावलोकन केल्यास वस्तुस्थिती निराळी








असल्याचे आपल्या दृष्टोत्पत्तीस येते. प्रादेशिक घटक राज्ये हीच राष्ट्र या संज्ञेला पात्र असल्याप्रमाणे दिसतात. कारण त्यांच्या सांस्कृतिक जीवनात स्थूलपणाने, ढोबळमानाने एकजिनसीपणा दिसून येतो. विशिष्ट प्रादेशिक भूखंडाविषयी त्या त्या लोकसमूहाला ममत्व वाटते, कारण त्या भूभागाला समान इतिहास-परंपरांनी वाटचाल लाभलेली असते, देवधर्माविषयीच्या श्रद्धा-समजुती, उपासना-आचारपद्धती, रुढी-चालीरीती यांच्या सतत साहचर्य–आदानप्रदानामुळे एकतेची भावना आपपतः रुजलेली असते, तंतोतंत सारखेपणा सर्व जीवनांगांच्या विनिमयात दिसत नसला तरी शेकडो वर्षांच्या सहजीवनामुळे फरकाबद्दल समावेशक सहिष्णुता अंगी बाणलेली असते. आणि या साऱ्या सांस्कृतिक जीवनाची वाचक अशी भाषा निरनिराळ्या बोलीभाषांच्या धाग्यातून प्रादेशिक साकल्याचे बंध निर्माण करीत असते. अशी सामाजिक-सांस्कृतिक परिस्थिती भारताच्या घटक राज्यांच्या पातळीवरच दिसून येते. या प्रादेशिक जीवनसंबंधात बदल करण्याचा प्रयत्न हा तीव्र मतभेद, विघटना निर्माण करणाराच ठरत आला आहे. म्हणून केवळ सांस्कृतिक जीवनविकासासाठी आवश्यक म्हणूनच नव्हे तर राजकीयदृष्ट्या फुटीरपणा व सामाजिक विघटन टाळण्यासाठी देखील भाषासंबंधीची सर्व ध्येयधोरणे ठरविताना प्रदेश-राज्य हाच घटक धरावा.

## भारतीय जीवनातील बहुविधतेचे स्वरूप

सर्व पातळीवरील शैक्षणिक, शासकीय व न्यायालयीन व्यवहाराबाबत भाषिक ध्येयधोरणे आखण्यासाठी विशिष्ट प्रादेशिक लोकसमूहाला म्हणजेच निरनिराळ्या घटक राज्यांना पूर्ण मुभा द्यावी ह्या विचारधारणेला प्रादेशिक समाजांतर्गत स्थूल एकजिनसीपणा हा जसा कारणीभूत आहे तसेच दुसऱ्या बाजूने पाहता अखिल भारतीय समाजजीवनपद्धतीही कारणीभूत झालेली आहे. भारतीय जीवनातील ' विविधतेतून प्रगट होणाऱ्या एकते 'संबंधी आपण खूप ऐकले वाचले आहे. गेल्या शतकभरात स्वातंत्र्य प्राप्तीसाठी झालेल्या आंदोलनांना अखिल भारतीय जनसमूहालाच आवाहन करावे लागले होते, आणि परदास्यविमोचन हाच सर्व राजकारण-समाजकारणाचा ध्रुवतारा मानला गेल्यामुळे निरनिराळ्या चळवळीतून व सनदशीर प्रयत्नातूनही भारतीय ऐक्यभावाचा प्रत्यय येत होता. दास्यशृंखला तोडून टाकणे हीच एकमेव महत्तम समस्या तत्कालीन भारताला ग्रासून राहिलेली असल्यामुळे, आणि त्याचसाठी सर्व समाजाचे संघटन एकमुखी करण्यासाठी समाज प्रबोधनाला भारतीय समाजाच्या एकजिनसीपणाचा सतत पुकारा करीत राहावे लागले होते. परंतु पारतंत्र्यकालात खऱ्याखुऱ्या समाजजीवनाला, विकासाला सुरुवातच झालेली नव्हती. म्हणून सद्यकालीन उग्र स्वरूप धारण करणाऱ्या समस्या ह्या त्याकाळी मुळी समस्याच नव्हत्या. परिमाणतः भारतीय समाजातील ऐक्यभावाच्या, त्याच्या बहुविधतेच्या खऱ्या स्वरूपाचे आपणाला यथायोग्य आकलन होऊ शकले नाही. स्वातंत्र्योत्तर कालानंतर मात्र समाजाची पुनर्रचना करीत असतना भारतीय समाजजीवनपद्धतीतील बहुविधतेचे स्वरूप आपणाला अधिकाधिक समजू-उमजू लागले आहे. धर्म, पंथ, वर्ण जातिव्यवस्था, रुढी यासारख्या जीवनातील निरनिराळ्या अंगोपांगांबाबतीत फार मोठ्या प्रमाणात विविधता जशी आढळते तशीच हवामान, भूरचना, खनिजे, पिकपाणी यासरख्या नैसर्गिक घटकांबाबतही विविधता दिसून येते. भाषेच्या बाबतीतही हेच दिसून येते. अनेक प्रमुख भाषा, शेकडो बोलीभाषा, निरनिराळ्या लिप्या, शब्दसंग्रहातील निराळेपणा, लिंग- विभक्ति- प्रत्ययादी व्याकरणाच्या लकबीतील फरक, कमीअधिक मूळाक्षरे, शब्दोच्चाराच्या अनेक तऱ्हा, वाङ्मय- शास्त्र यांचा निरनिराळ्या पातळीवर झालेला विकास यासारख्या भाषिक अंगोपांगात कमालीची विविधता व वैचित्र्य प्रचलित असल्याचे आढळून येते. परंतु बहुविधतेचे वर्णन एवढ्यावर थांबत नाही. स्वातंत्र्योत्तर काळात होत असलेल्या सामाजिक परिवर्तनाचे बारकाईने अवलोकन केले तर आपल्याला असे आढळून येते की या जीवनपद्धतीतील बहुविधतेत फार मोठे अंतर आहे. जीवनातील विविध अंगोपांगे, प्रकार व पातळी याबाबतीत एकमेकाशी विसदृश, विसंगत असल्याचेच आपल्या प्रत्ययास येते. निरनिराळ्या प्रादेशिक जीवनपद्धतींचे या दृष्टीने अवलोकन केल्यास आपणास केवळ स्वतःचाच कोश करून राहणाऱ्या व स्वतःच्या अस्मितेची ज्वलंत जाणीव असलेल्या जीवन-








रहाटी एकमेकांशेजारी वसत असल्याचे आढळून येतात. एवढेच नव्हे तर बऱ्याच ठिकाणी व बऱ्याच बाबतीत एकमेकाबद्दल अज्ञान, त्यातून निर्माण होणारा दुरावा किंवा आकस, रहाणीतील अंतर्गत मूलगामी विरोध, त्यातून निष्पन्न होणारे शत्रुत्व, सहकाराधिष्ठित जीवनावरील अश्रद्धा व तज्जन्य उपेक्षा यासारख्या अंतर्विरोधांनी ते बुजबुजून गेले आहे असे आपल्या लक्षात येते. बहुविधतेतून एकत्व प्रस्थापित करू पाहणाऱ्याला भारतीय जीवनपद्धतीतील असल्या अंतर्विरोधांचीच, परस्परांचा शक्तिपात करणाऱ्या विसदृशतेचीच प्रामुख्याने जाणीव होऊ लागली आहे. एकत्वाच्या केंद्रात विलीन न होऊ पाहणारी, स्वतःचे स्वतंत्र अस्तित्व प्राणपणाने उराशी कवटाळणारी, तडजोडीला फारशी तयारी नसलेली बहुविधता भारतीय जीवनात प्रचलित असल्याचे हळूहळू आपल्या प्रत्ययास येऊ लागले आहे. भाषा ह्या जीवनसंबंधात अशा प्रकारच्या बहुविधतेचे ज्वलंत प्रतिबिंब पडलेले आपणास दिसून येऊ लागले आहे. बहुविधतेच्या स्वरूपाचे जसजसे आपणास आकलन होऊ लागेल तसतसे आपले समाजपुनर्रचनेसंबंधीचे, भाषिक ध्येयधोरणासंबंधीचे विचार आपणास फिरवावे लागतील. या विवेचनातून उद्‌भवणारा एक सामान्य निष्कर्ष ध्यानात यावा तो हा की अखिल भारतीय पातळीवरून, सर्व भारतीय जीवनाला लागू पडणारी एकच एक भाषासंबंधीच्या धोरणाची पुनर्रचना करण्याचा आपण जसजसा प्रयत्न करू तसतसा आपणास विरोधच होण्याचा संभव अधिक. वस्तुस्थितीचे यथायोग्य आकलन न झालेल्या संश्लेषणाच्या प्रयत्नात विघटनेचेच अंगार धुमसत राहणार. ही विघटना टाळण्यासाठी सामान्यतः प्रादेशिक भाषांना ( मातृभाषांना ) आपापल्या विकासाबाबत पूर्ण स्वातंत्र्य द्यावे हे कालोचित व प्रगमनशील ठरणारे होईल.

## मातृभाषा : एक अविभाज्य जीवनसंबंध

प्रादेशिक भाषांना, मातृभाषांना (भाषावार प्रांतरचनेनंतर आता मातृभाषा ह्या प्रादेशिक भाषा झाल्या आहेत.) प्रदेशराज्यांतर्गत सर्वत्र सर्वोच्च महत्त्व द्यावे, त्यांच्या व्यवहार-विकासाची सर्व धोरणे प्रादेशिक राज्यसरकारांनीच लोकमतानुसार ठरवावीत हे विचारसूत्र भाषासमस्येतील बरीचशी गुंतागुंत नाहीशी करणारे ठरेल. याबाबतीतच कमीत कमी विरोध होण्याचा संभव आहे. कारण मातृभाषेचे महत्त्व अनन्यसाधारण असल्याचे सर्वमान्य आहे. जगातील सर्व शिक्षणशास्त्रज्ञांनी व मानसशास्त्रज्ञांनीच केवळ नव्हे तर राज्यशासकांनी, समाजधुरीणांनी, धर्मप्रवर्तकांनी, कविकलावंतांनीही जन्मभाषेची महति निरपवादपणे गायिलेली आहे. निरनिराळ्या कालखंडातील जनसामान्यांनी देखील प्रत्यक्षाप्रत्यक्ष मार्गांनी मातृभाषेला एकमुखी पाठिंबा दर्शविल्याचे इतिहास सांगतो. जुन्या संस्कृत सुभाषिताच्या सुरात आपणास असे म्हणता येईल की जननी, जन्मभूमी आणि जन्मभाषा, यांचे महात्म्य स्वर्गापेक्षाही मोठे आहे. कारण जन्मभाषा हा जीवनातील एक अपरिहार्य असा घटक आहे, एक अविभाज्य असा जीवनसंबंध आहे. मातृभाषा ही निर्जीव अशी वस्तु मुळी नाहीच, तर तो एक जिवंत व ज्वलंत असा जीवभावसंबंध आहे. जननीप्रमाणेच जन्मभाषेविषयी मानवमात्राला अकृत्रिम जिव्हाळा, निरपेक्ष सौहार्द वाटत असते. कारण त्याला तिचा जन्मापासूनचा निकट सहवास लाभलेला असतो, त्याच्या जीवनविकास–वाटचालीतील अनंत क्रियाप्रक्रियांना ती साक्षीभूत असते, त्यांच्या सुखदुःखांशी ती पूर्णपणे समरस झालेली असते, त्याची श्वसिते–निश्वसिते ती आपल्या उराशी बाळगीत असते. मातृभाषेच्या निरपेक्ष व निस्सीम उपयुक्ततेमुळे आणि माणसाच्या कर्तृत्वाला तिच्या होणाऱ्या मनःपूर्वक उत्स्फूर्त सहकार्यामुळे माणसाचे तिच्याशी एकप्रकारचे कोमल, हळुवार असे अतूट भावबंध प्रस्थापित झालेले असतात. अतएव, मातृभाषांना सर्वोच्च प्रतिष्ठेचे स्थान देणे हे धोरण भाषिक समस्येतील सर्व विरोधांचा, उलटसुलट विचारांच्या वादळाचा उपशम करणारा बदल ठरेल. कै. जवाहरलाल नेहरू यांनी म्हटल्याप्रमाणे प्रादेशिक भाषांना, मातृभाषांना ज्ञानविज्ञानाच्या, कलावाङ्मयाच्या, सर्व सामाजिक संबंधांच्या माध्यमाचे स्थान देणे हा भाषिक जीवनात सुव्यवस्था निर्माण करणारा क्रांतिकारक बदल ठरेल. हा विचार केंद्रीभूत धरूनच तो कार्यान्वित करताना येणाऱ्या अडचणींचा परिहार कसा करावयाचा याची योजना करावी.








### मोठा कालावधी लागेल

भाषिक धोरणातील बदलामुळे देशात सगळीकडे गोंधळ माजेल, सर्वत्र संकुचित प्रांतीयवाद व भाषिक दुरभिमान बोकाळेल, ज्ञानपातळी एकदम खालावेल, वैचारिक आदान-प्रधान थांबेल, आंतरराष्ट्रीय संबंध ठेवता येणार नाहीत. ह्यासारख्या प्रतिक्रिया एका गैर-समजावर उभारलेल्या दिसतात. तो असा की भाषासंबंधीची ध्येय धोरणे ठरविल्याबरोबर लगेच त्यांची उद्दिष्टे साध्य होतील व त्यांचा अंमल सर्वदूर जारी होईल. त्यामुळे जनसामान्यांना त्या बदलाचा झटपट अंगीकार करता येणार नाही. परिणामतः सर्वत्र अराजक माजून शिक्षणक्षेत्रातील उच्चस्तर टिकवून धरणे अशक्यप्राय होईल. परंतु साधारणपणे याबाबतीत आपणास असे म्हणता येईल की कोणतीही भाषिक ध्येयधोरणांची आखणी ही केवळ एक दिशा असते. त्यातून सूचित होणारा बदल प्रत्यक्षात येण्यास फार मोठा कालावधी लागत असतो. भाषिक ध्येयधोरणे ही एक सतत विकसत राहणारी, कालमानानुसार सतत बदलत राहणारी प्रक्रिया असते. तिचा सर्वकाळी लागू पडणारा एकच एक सिद्धांत, तिचे एकच एक अंतिम स्वरूप मांडता येत नसते. म्हणून सध्याच्या संक्रमणावस्थेतून बदलत जाऊन भाषिक व्यवस्था स्थूलमानाने स्थिरपद होण्यास बऱ्याच मोठ्या कालखंडाची आवश्यकता आहे ही गोष्ट आपण सतत ध्यानात ठेविली पाहिजे.

सामाजिक पुनर्घटनेतला कोणताही बदल लोकशाही पद्धतीनुसार अनेक स्थित्यंतरातून आकार घेत असतो. जनमताचा कौल घेत, नव्या बदलाबाबतीत लोक-शिक्षणातून जागृती करीत, जनसामान्यांना पटेल, पचेल, पेलेल त्या प्रमाणात पावले टाकीत समाजरचनेतील नव-व्यवस्था रूप धारण करीत असते. सामान्यतः लोकशाही-तील कोणताही बदल मंद स्वरूपात होत असतो. आणि भारतीय लोकशाहीच्या वैशिष्ट्यपूर्ण स्वरूपामुळे तर भाषिक प्रश्नाचा उलगडा होण्यास बराच मोठा काल लागेल असे दिसते. भाषासंबंधीची प्राथमिक माहिती, निरनिराळ्या मतमतांतरांचे प्रातिनिधिक स्वरूप, नव्या व्यवस्थेतून उद्भवणाऱ्या अडचणी, त्यांचा परिहार करण्याच्या संभवनीय योजना इत्यादी गोष्टी यथायोग्य समजून घेऊन त्यांची कालोचित जुळणी करण्यात राष्ट्राची योजकताबुद्धी व काल फार मोठ्या प्रमाणात कामी पडेल.

दुसरे असे की लोकशाहीच्या बाल्यावस्थेमध्ये अपेक्षित लोकशाहीवृत्ती, तडजोड करून मिळतेजुळते घेऊन मार्ग काढणारी सहकारी दूरदृष्टी, कालानुरूप बदलत राहणारी लवचिक मनोवृत्ती, खिलाडूवृत्ती फारच कमी प्रमाणात दिसून येते. याऐवजी प्रतिष्ठेच्या व मानाच्या खोट्या कल्पना उराशी बाळगून रूढी-प्रियता व पारंपरिकता वावरत असते. दुराग्रह वाटावा इतका स्वमताविषयी अभिनिवेश, आपली मते दुसऱ्या-वर लादण्याची अपप्रवृत्ती, राष्ट्रीय दृष्टीचा अभाव यासारख्या विध्वंसक प्रवृत्तीतून वाट काढीत मार्ग-क्रमण करण्यात किती काळ जातो ते सांगता येत नाही. लोकशाहीत अशा मतप्रवृत्तींना डावलूनही चालत नसते. आणि त्यांची समजूत पटवीत धोरणे आखणे हे अत्यंत जिकीरीचे होत असते. सध्या समान्यजनापासून उच्च पदस्थ अधिकारी, वृत्तपत्रे, मंत्री, शिक्षणतज्ञ किंवा विद्या-पीठांचे कुलगुरू यांच्यापर्यंत सर्वांनी भाषाधोरणासंबंधी प्रगट केलेले विचार सूक्ष्मदृष्टीने पाहिले तर ते लोक-शाही वृत्तीतील अपरिपक्वतेचे व अदूरदृष्टीचे निदर्शक वाटतात. राष्ट्रभाषा म्हणून हिंदी व राष्ट्रीय ऐक्य यातून एकाचीच निवड करावी लागेल ही दक्षिणेतील अहिंदी भाषिकांची वक्तव्ये केवळ दूराग्रहीच नव्हेत तर राष्ट्रद्रोही वृत्तीची द्योतक आहेत. तर याची उलट प्रतिक्रिया म्हणूनच इंग्रजीला पूर्ण नेस्तनाबूद करण्याचे उत्तरेतील हिंदी भाषिकांचे धोरण केवळ त्यांचेच नव्हे तर राष्ट्राचेही नुकसान करणारे ठरेल. बँका वगैरे सारख्या इंग्रजीतून व्यवहार करणाऱ्या संस्थांना केवळ हिंदीतून पत्र पाठवून हिंदीतूनच उत्तर मिळाले पाहिजे असा आग्रह धरणे, शिक्षणमंत्र्यांच्या समिती-मध्ये आपापल्या भाषेतून भाषणे करून गोंधळ उडवून देणे, लोकसभेच्या कामकाजात केवळ हिंदी किंवा इंग्रजीतून उत्तरे देण्याबाबत हट्ट धरणे, हिंदी-अहिंदी भागातील कुलगुरूंनी परिषदेत एकमेकांवर हेत्वारोप करणे यासारख्या घटना म्हणजे राष्ट्रविघातक अपप्रवृ-त्तींचे थैमानच नव्हे काय ? याशिवाय, इंग्रजीतून सर्व व्यवहार करण्याची संवय अंगवळणी पडलेला सध्यातरी मोठ्या प्रमाणात असलेला निरनिराळ्या पातळीवरील अधिकारीवर्ग प्रादेशिक भाषा किंवा








हिंदी आल्यास आपण स्थानभ्रष्ट होऊ या भीतीने इंग्रजीच्या महतीचा डांगोरा पिटीत भाषिक धोरणाच्या चालत्या गाडीला खीळ घालण्याचा प्रयत्न करीत असतो. शासकीय, न्यायालयीन पातळीवरील बऱ्याच व्यवहारांच्या नाड्या यांच्या हातात असल्यामुळे भाषिक बदलांबद्दलच्या त्यांच्या नाखुशीचीही दखल घ्यावी लागते. अशा प्रकारच्या लोकशाहीच्या बाल्यावस्थेतील अपरिपक्व, अराष्ट्रीय व अदूरदृष्टीच्या अपप्रवृत्तीतून निर्माण होणाऱ्या अनंत अडथळ्यांना तोंड द्यावे लागत असल्यामुळे भाषिक धोरणाची वाटचाल सुस्थित होण्यास दीर्घकाल घेणार हे निश्चित.

भारताची आर्थिक दुरवस्था ही देखील भाषिक धोरणांची उद्दिष्टे कार्यान्वित करण्याचा वेग मंदावण्यास कारणीभूत होईल. अन्नधान्य, लोकसंख्यावाढ, संरक्षण यांसारख्या ज्वलंत समस्यांचा उपशम करण्यातच भारतीयांना येती कित्येक वर्षे आपल्या संपत्तीची आहुती द्यावी लागेल. भाषिक प्रश्नासंबंधी कितीही चर्चा-परिषदा, वादवादंग, खळबळजनक उद्रेक झाले तरी शेतकी, औद्योगीकरण, सैन्याचे आधुनिकीकरण यावर होणाऱ्या प्रचंड खर्चाचा ओघ भाषिक सुव्यवस्था प्रस्थापित करण्याकडे वळविणे हे भारत सरकारला सुतराम् शक्य नाही. प्रादेशिक भाषा माध्यमासाठी पाठ्यपुस्तके तयार करण्याच्या प्राथमिक गरजेवरच बराच मोठा खर्च होईल. आणि निरनिराळी भारतीय व परकीय भाषाशिक्षणाची केंद्रे भारतभर स्थापून चालविणे, त्यासाठी योग्य शिक्षकवर्ग तयार करणे, आवश्यक त्या साधनसामग्रीची जुळवाजुळव करणे यावर होणारा व्यय हा इतर कोणत्याही प्रमुख बाबींवर होणाऱ्या खर्चापेक्षा कमी होणार नाही. आणि राष्ट्रीय व्ययाच्या अग्रक्रमात भाषिक व्यवस्थेचा क्रम बराच खालचा लागत असल्यामुळे भाषाविकासावर आवश्यक तेवढा खर्च करणे केंद्र व घटक राज्यांना बरीच वर्षे शक्य होणार नाही. परिणामतः भाषिक उद्दिष्टे फलद्रूप होण्यास मोठा काळ लागेल.

शिवाय, भाषाविकास हा त्या त्या लोकसमूहाच्या आपापल्या भाषेवरील उत्कट प्रेमावर व त्याच्या कुवतीवर अवलंबून असतो. भाषासंबंधीच्या उद्दिष्टांची आखणी केल्याने व मोठ्या रकमेची तरतूद केल्यानेच केवळ निरनिराळ्या भाषांचा समान विकास होईलच असे सांगता येत नाही. ज्ञानविज्ञान, कलावाङ्मय यातील दर्जा व विस्तार याबाबतीत निरनिराळ्या भाषांमध्ये नेहमी चढ-उतार, कमीजास्त विकास हा दिसून येत असतो. लोकसमूहाच्या विविध जीवनक्षेत्रातील उफाळून येणाऱ्या कर्तृत्वावरच त्या लोकसमूहाच्या भाषिक अभिव्यक्तीचे सामर्थ्य अवलंबून असते. स्वभाषेसंबंधीचा ज्वलंत, दुर्दम्य अभिमान व तिच्यावरील निरतिशय प्रेम या अन्तःप्रेरणाच एखाद्या भाषेच्या पोटतिडीकीने होणाऱ्या विकासात कार्यकर असतात. म्हणून भाषाविकास व समृद्धी याबाबत आपण नेमके गणित मांडू शकणार नाही.

येथवरच्या विवेचनाचा सारांश असा : भाषा प्रश्नाची सोडवणूक करताना आपण काही वस्तुस्थितीची यथायोग्य जाणीव करून घेतली पाहिजे. लोकशाही पद्धतीच्या मार्गाची दृढ जाणीव ठेवणे हे सर्वप्रथम आवश्यक आहे. अखिल भारतीय पातळीवरून नव्हे तर घटकराज्य हेच केंद्र धरून भाषिक ध्येयधोरणे आखणे आवश्यक आहे ह्या गोष्टीचे नीट भान राखले पाहिजे. मातृभाषांना ( प्रादेशिक भाषांना ) सर्वत्र सर्वोच्च महत्त्व हा आपल्या भाषासंबंधीच्या सर्व धोरणांचा गाभा मानला पाहिजे. आणि अखेरीस भाषाविकासासाठी व त्यांच्या सुव्यवस्था-समृद्धीसाठी बराच मोठा कालावधी लागेल हेही आपण निश्चितपणे लक्षात ठेवले पाहिजे.

दुसऱ्या बाजूने पाहिल्यास या भाषिक प्रश्नात गुंतागुंत वाढविण्यास काही गैरसमज व बरेच दुराग्रह कारणीभूत आहेत असे आपणास दिसेल. त्यांचे निराकरण करताना आपणाला हिंदी व इंग्रजीचे भारताच्या भाषिक जीवनातील स्थान काय ते ठरवावे लागेल. आणि याच संदर्भात जोडभाषेचा प्रश्न, राष्ट्रीय एकात्मता व आंतरराष्ट्रीय संबंध यांचा भाषेशी असलेला संबंध यासारख्या जटिल वाटणाऱ्या दुव्यांचा उलगडा करावा लागेल.

## हिंदीवाद्यांचा दावा

स्वातंत्र्यपूर्वकालापासून हिंदीला भारतीय जीवनात महत्त्वपूर्ण स्थान दिले जात आहे. महात्मा गांधी, पंडित नेहरू यांच्यासारख्या राष्ट्रीय नेत्यांनी हिंदीचा










राष्ट्रभाषा म्हणून पुरस्कार केला होता. अखिल भारताचे प्रतिनिधित्व करणाऱ्या या हिंदी वा हिंदुस्तानीचे स्वरूप कसे असावे यासंबंधी विचारविमर्श होत असला तरी हिंदी–अहिंदी भागातील बऱ्याच जाणत्या पंडितांनी हिंदीचा पाठपुरावा केलेला आहे. हिंदी ही सर्वसमावेशक व लवचिक भाषा असून मराठी, गुजराती, उडिया, असामी, बंगाली यासारख्या उत्तर व मध्यम भारतीय भाषांच्या रूप व ठेवणीशी तिचे बरेच साम्य आहे, द्रविडकुल भाषिक दाक्षिणात्यांनाही हिंदी ही इंग्रजीपेक्षा समजण्यास सोपी आहे, कारण द्रविडी भाषेतील संस्कृत शब्दांचा भरणा हा त्यांना हिंदीशी जोडणारा समान दुवा आहे, म्हणून हिंदी हीच भारताची प्रातिनिधिक भाषा, राष्ट्रभाषा होऊ शकेल. एवढेच नव्हे तर भारतीयांनी तिला राष्ट्रभाषा म्हणून एकमुखी मान्यता द्यावी असा एक विचारप्रवाह हिंदीच्या पुरस्कर्त्यांनी रूढ केला आहे. या विचारापासून प्रेरणा घेऊन काही अतिउत्साही हिंदीवाद्यांनी असे मत मांडले आहे की हिंदी ही राष्ट्रभाषा असल्यामुळे तिचा प्रथम शासकीय व्यवहारात व नंतर क्रमाक्रमाने लोकव्यवहारात वापर जारी करावा. तसेच विद्यापीठीय स्तरावर, उच्च ज्ञानविज्ञान व संशोधन या क्षेत्रांमध्येही आदानप्रदानाकरिता हिंदीचा माध्यम म्हणून उपयोग करावा. हिंदीच्या अशा सर्वदूर प्रसारामुळे भाषिक समस्येतील सर्व प्रश्न सुटतील आणि राष्ट्रीय एकात्मता फार झपाट्याने दृढ होईल.

हिंदीवाद्यांच्या या विचारसरणीची सूक्ष्म तपासणी केल्यास ती बऱ्याच अवास्तव समजावर आधारली असल्याचे आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल. हिंदी उत्तरेतील काही राज्यांची प्रादेशिक भाषा असली व इतर कोणत्याही एका भारतीय भाषिकापेक्षा हिंदी भाषिक हे संख्येने अधिक असले तरी केवळ या तिच्या गुणवत्तेमुळे हिंदी ही अखिल भारतीय जीवनाचे प्रतिनिधित्व करू शकेल हे म्हणणे अवास्तव ठरेल. समग्र भारतीय जीवनाचे प्रतिबिंब धारण करणारी अशी कोणतीही एक भारतीय भाषा दाखविता येणार नाही. भारतीय जीवनाच्या साकल्याची वाचक, बहुमुखी -बहुविध सांस्कृतिक जीवनाची वाहक अशी पदवी सुयोग्यपणे कोणतीही एक भारतीय भाषा धारण करू शकत नसल्याचे आपल्या प्रत्ययास येऊ लागले आहे. सामाजिक-वैज्ञानिक शास्त्रे, कला-वाङ्मय व शासकीय व्यवहार यातील क्षमतेच्या दृष्टीने पाहिले तर कदाचित हिंदीपेक्षा मराठी, बंगाली, तामीळ यासारख्या भाषाच प्रगल्भ व संपन्न असल्याचे दिसून येईल. आणि तरीही बंगाली–मराठी यासारख्या भाषा–एकेकटी किंवा दोन्ही तिन्ही मिळूनही– राष्ट्रभाषेच्या पदवीवर आरूढ होऊ शकणार नाहीत. म्हणून विचारपूर्वक सूज्ञपणाने भारतीय घटनेने सर्व भारतीय भाषांना राष्ट्रभाषा म्हणून मान्यता दिली आहे व त्यांचा समान विकास करण्याचे उद्दिष्ट पुढे ठेवले आहे.

दुसरे असे की कोणत्याही कारणाने का होईना हिंदीला अखिल भारतीय पातळीवरील स्थान देणे म्हणजे इतर भाषिक सांस्कृतिक जीवनांना गौण, दुय्यम मानल्यासारखे होईल. आणि कोणत्याही कसोटीने हे सिद्ध होण्याजोगे नाही. हिंदी भाषिक घटकराज्यांहून इतर भाषिक राज्ये सांस्कृतिक जीवनाच्या समृद्धतेबाबत कमी दर्जाची मानता येतील काय ? मग केवळ संख्याधिक्याच्या जोरावर अखिल भारतीय पातळीवरील स्थान पटकविण्याचा हिंदीला कसा काय अधिकार पोहोचतो ?

शिवाय, कोट्यवधी जनसामान्यांचे कर्तृत्व, सर्वक्षेत्रातील पराक्रम फुलून यावा, त्यांच्या सुप्त गुणवत्तेला विकासण्यासाठी पूर्ण संधी द्यावी व त्याच्या जोरावर संपन्न संस्कृती उभारावी असे वाटत असेल तर शैक्षणिक व शासकीय व्यवहारासाठी लोकभाषेचा पुरस्कार करण्याशिवाय दुसरा पर्यायच उरत नाही. लोकभाषेला डावलून इतर भाषांच्या साहाय्याने प्रभावी व प्रबळ संस्कृती उभारली गेल्याचे इतिहासाला तरी ज्ञात नाही. प्राचीन इजिप्त, ग्रीस, रोम, चिनी, जपानी संस्कृतींनी विराट लोकसमूहांच्या कर्तृत्वावरच त्यांच्या लोकभाषांमार्फतच ऐश्वर्यसंपन्न सुवर्णयुगे प्रस्थापिली असे इतिहासाचे कथन आहे. लोकभाषेव्यतिरिक्त इतर भाषेतून शासकीय व्यवहार चालविल्यास सरकारी पातळीवर एक प्रकारचा विशिष्ट वर्ग तयार होतो आणि तो सामान्यतः जनसामान्यांपासून फटकून राहण्याचा प्रयत्न करीत असतो. ब्रिटिशांनी भारतीयांवर इंग्रजी लादून असा लब्धप्रतिष्ठितांचा वर्ग तयार केल्याचे आपण पाहतो आहोत, त्याचे दुष्परिणाम आपण








अद्यापिही अनुभवितो आहोत. म्हणून सर्व शासकीय व्यवहारात हिंदीचा वापर सर्वदूर आवश्यक केला तर जे इंग्रजीच्या बाबतीत भारतभर झाले तसेच हिंदीच्या बाबतीत अहिंदी राज्यात होण्याचा संभव आहे. म्हणून हिंदी ही अखिल भारताची लोकभाषा नसून ती एक प्रादेशिक भाषा आहे आणि इतर भाषेइतकाच दर्जा तिला दिला पाहिजे या गोष्टीची आपण सतत जाणीव ठेवली पाहिजे.

## जोडभाषा– एक यक्षप्रश्न ?

प्रादेशिक भाषांचा माध्यम म्हणून स्वीकार केल्यास निरनिराळ्या विद्यापीठांतील वैचारिक देवाण-घेवाणीच्या मार्गात अडचणी येतील, अध्ययन-अध्यापनार्थ विद्यार्थी-शिक्षकांना निरनिराळया राज्यात जाणेयेणे अशक्यप्राय होईल. आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे प्रादेशिक संकुचितपणा वाढून निरनिराळ्या राज्यात पृथक्‌पणाची भावना दुणावेल अशी भीती व्यक्त करण्यात येते. यावर उपाय म्हणून, देशाच्या ऐक्याला तडा न जाता आंतरप्रांतीय संबंध प्रस्थापित करण्यासाठी हिंदी ही सर्व देशभर आवश्यक भाषा करावी असे एक मत मूळ धरू लागले आहे. सरकारी प्रवक्ते, विविध पक्षांतर्फे प्रसिद्ध होणारी निवेदने, काही प्रसिद्ध विचारवंत आंतरप्रांतीयसंबंधासाठी एका समान भाषेची आवश्यकता प्रतिपादितात आणि हिंदीच अशा समान भाषेचे कार्य करू शकेल असा विश्वास व्यक्त करताना दिसतात. अशा विचारप्रवाहातून ‘आंतरप्रांतीय संबंध म्हणजे काय’ हे तितकेसे स्पष्ट होत नाही. तसेच असा संबंध एकाच भाषेच्या साहाय्याने साधता येईल आणि अशी एकच भाषा स्वीकारली तरच राष्ट्रीय ऐक्य टिकून राहील अशी धारणा या विचाराच्या बुडाशी असल्यासारखी दिसते. राज्ये व केंद्र सरकार यांचे शासन, सैन्य, लोकसभा, उच्च न्यायालये यासारख्या अखिल भारतीय संस्थांमार्फत होणारा व्यवहार सध्या इंग्रजीतून होतो. तेथे हिंदीचा वापर सुरू करावा असे जनमत असल्याचा दावा करण्यात येतो. तेव्हा जोडभाषा म्हणून इंग्रजी की हिंदी असा प्रश्न सध्या उपस्थित झाला आहे.

इंग्रजीच्या बाजूने असे सांगण्यात येते की आपणाला आवडो वा न आवडो ही एक सर्वप्रकारे समृद्ध भाषा आहे आणि तिने भारताचे शासकीय, शैक्षणिक व न्यायालयीन ऐक्य टिकवून धरले आहे. शिवाय सर्वप्रकारचे कारभार इंग्रजीतून पार पाडण्याची सवय अंगवळणी पडलेला फार मोठा नोकरवर्ग सध्या अधिकारावर आहे. त्यांना हे व्यवहार हिंदीतून करण्यास सांगण्याने त्यांची कार्यक्षमता खालावेल व अंती सर्व शासनव्यवस्था विस्कळीत होण्याचा संभव आहे. शिवाय इंग्रजीची जागा घेण्याइतकी हिंदी सर्व दृष्टीने समृद्ध नाही. इंग्रजी आपली मातृभाषा आहे असे सांगणार मोठा वर्ग भारतात वसत असल्यामुळे इंग्रजी ही भारतीयांना तितकीशी परकीय वाटत नाही असेही सांगण्यात येते. म्हणून सध्यातरी इंग्रजीचाच जोडभाषा म्हणून वापर चालू राहावा असे मत मांडले जाते. उलट पक्षी असे म्हटले जाते की, हिंदी ही स्वकीय व आकलनसुलभ अशी भाषा आहे. तिचा सर्व कारभारक्षेत्रातून वापर सुरू केल्यास तीही सत्वर कार्यक्षम व समृद्ध होईल. कारण सर्वगामी सतत वापरानेच कोणतीही भाषा परिपक्व दशेस पोहोचते. इंग्रजी ही कितीही महत्त्वाची व उपयुक्त भाषा असली, शिक्षणातील दर्जाचा व कारभारातील कार्यक्षमतेचा प्रश्न उभा करून तिचे महत्त्व ठसवून देण्याचा प्रयत्न केला तरी बहुजनसमाजाला ती परकी भाषा पेलणार नाही. दीडशे वर्षांच्या करड्या अमलानंतरही सुमारे दोन टक्के लोकांनाच इंग्रजी चांगले समजते, अशी स्थिती आहे. अशा दोन टक्के बव्हंशी वरिष्ठ वर्गीयांच्या सोयीसाठी इंग्रजी दीर्घकाळ राष्ट्रावर लादणे इष्ट ठरणार नाही. शिवाय जोडभाषेचा प्रश्न बहुजनसमाजाची सोय व राष्ट्रीय अस्मितेचा स्वाभिमान या संदर्भातच सोडविला पाहिजे. लोकव्यवहार लोकभाषेतून व्हावा हे तर लोकशाहीचे प्रमुख मूल्य आहे. अशा अनेकविध दृष्टींनी पाहिल्यास हिंदी हीच जोडभाषा होऊ शकेल असे मत मांडले जाते.

जोडभाषेच्या प्रश्नाकडे केवळ व्यावसायिक दृष्टीनेही पाहिले जात आहे असे दिसते. दाक्षिणात्यांचा हिंदीविरोध हा नोकऱ्यांच्या प्रश्नावरूनच निर्माण झाला आहे असे सांगण्यात येते. इंग्रजीच्या जागी पुढे जेव्हा हिंदी येईल तेव्हा अखिल भारतीय स्पर्धापरीक्षांतले व एकंदरीने सरकारी नोकऱ्यांतले आपले स्थान घटेल व हिंदी मातृभाषा असणाऱ्यांना अधिक लाभ







आपोआप होईल असे वाटल्याकारणाने दाक्षिणात्य हिंदीला तीव्र विरोध करतात तर दाक्षिणात्यांचे सर्वंकष आक्रमण थोपविण्यासाठी व दक्षिणेतील उद्रेकाची प्रतिक्रिया म्हणून उत्तरेतील हिंदीचे अभिमानी इंग्रजीला उखडून टाकण्यास सज्ज झाले आहेत. तेव्हा सद्यकालीन स्फोटक परिस्थितीत एक तडजोड म्हणून, जोडभाषा प्रश्नाच्या सोडवणुकीचा एक पर्याय म्हणून एक आपद्धर्म म्हणून इंग्रजी व हिंदी या दोन्ही भाषांचा जोडभाषा म्हणून वापर करण्यास प्रत्यवाय नाही. केवळ इंग्रजी किंवा हिंदी हीच जोडभाषा होऊ शकते हे म्हणणे मात्र शुद्ध आक्रस्ताळेपणाचे, दुराग्रही, हेकेखोरपणाचेच नव्हे तर राष्ट्रविघातकही आहे.

परंतु जोडभाषेचे खरेखुरे कार्य म्हणजे आंतरप्रदेशीय सांस्कृतिक जीवनाचा परिचय करून देणे हे होय. प्रादेशिक सांस्कृतिक जीवन त्या त्या लोकसमूहाच्या निरनिराळ्या व्यवसाय-व्यवहारातून, अनेकविध क्रिया–प्रक्रियांतून, विविध कृती–उक्तीतून प्रगट होत असते. जीवनातील अंगोपांगांच्या अनेक प्रकार व पातळीतून साकार होणारे सांस्कृतिक संबंध एकमेकास ज्ञात करून देण्यास, त्यांना सलग्न करण्यास, एकमेकांच्या सुखदुःखात समरसून जाण्यास व अशाप्रकारे त्यांच्यातील भावनिक ऐक्य दृढ करण्यास जोडभाषा सतत साहाय्य करीत असते. अशी सांस्कृतिक समरसता एकमेकांच्या जीवनांचा प्रत्यक्ष परिचय होण्यानेच दृढ होत असते. सांस्कृतिक जीवनाच्या वरवरच्या माहितीपेक्षा साक्षात संबंधानेच मनाची कवाडे सताड उघडून हृदयबंध प्रस्थापित होत असतात. असे संस्कृतिसंबंध हे एकमेकांच्या प्रादेशिक भाषांतर्फेच सांधले जाण्याचा संभव आहे. कारण मातृभाषा ( प्रादेशिक भाषा ) ही स्फटिकाप्रमाणे सांस्कृतिक जीवनाचे जिवंत प्रतिबिंबच असते. मातृभाषेव्यतिरिक्त इतर कोणत्याही स्वकीय वा परकीय भाषेमार्फत असे खरेखुरे जीवनबंध संक्रमित होत नसतात. तेव्हा आपणास जर खऱ्याखुऱ्या अर्थाने आंतरप्रांतीय सांस्कृतिक ऐक्यभाव दृढ व्हावा असे वाटत असेल तर अधिकाधिक प्रमाणात प्रादेशिक भाषांच्या द्वारेच निरनिराळ्या प्रादेशिक सांस्कृतिक जीवनाच्या हृदयाशी आपणाला हात घालावा लागेल. म्हणून आपणास असे म्हणता येईल की सर्व प्रादेशिक भाषा ह्याच खऱ्या अर्थाने जोडभाषा म्हणून कार्य करू शकतील.

सर्व भारतीय भाषांचा जोडभाषा म्हणून वापर करणे व्यवहार्य आहे काय याचाही आपणाला विचार करावा लागेल. भारतीय भाषांना जोडभाषा म्हणून मान्यता व योग्य स्थान दिले जावे याचा अर्थ इंग्रजी व हिंदीचा जोडभाषा म्हणून त्याग करावा असा नाही. शासकीय व्यवहाराच्या दृष्टीने पाहिल्यास हिंदी-इंग्रजीबरोबर प्रादेशिक भाषांतूनही निरनिराळ्या राज्यांना आपापसात व केंद्राशी व्यवहार करण्याची मुभा द्यावी. तदनुरूप व्यवस्था केंद्रीय सरकारात करावी. ज्या कारणमीमांसेने आपण सर्व प्रादेशिक भाषांना राष्ट्रभाषा म्हणून मान्यता दिली त्याच कारणमीमांसेनुसार त्यांना जोडभाषा म्हणूनही सरकारी मान्यता देणे आवश्यक ठरते. तरच सर्व प्रादेशिक भाषांना समान वागणूक दिल्यासारखी होईल. प्रादेशिक भाषांना जोडभाषा-राष्ट्रभाषा म्हणून मान्यता व उचित स्थान देण्यासाठी सर्व भारतभर सर्व प्रादेशिक भाषा आवश्यक करण्याची जरूरी नाही. मात्र प्रत्येक राज्यात सर्व प्रादेशिक भाषांच्या अध्ययन-अध्यापनासाठी भरपूर प्रमाणात सोयी उपलब्ध करून दिल्या पाहिजेत. निरनिराळ्या प्रादेशिक भाषा शिकण्यासाठी घटक राज्यांनी प्रोत्साहन दिले पाहिजे. राज्यांच्या राजधानीत व इतर प्रमुख शहरात सर्व प्रादेशिक भाषांच्या अभ्यासाची केंद्रे स्थापिली जावीत. राज्यांच्या सीमाभागातील लहानमोठ्या गावात लगतच्या प्रादेशिक भाषांचा वापर सर्रास होत असल्यामुळे त्यांच्या अभ्यासाच्या सोयी मोठ्या प्रमाणात व्हाव्यात. सध्याच्या परिस्थितीत जिथे व ज्या प्रमाणात हिंदी शिक्षणाच्या सोयी असतील त्या प्रमाणात त्यांचाही भरपूर उपयोग करून घ्यावा. थोडक्यात, मातृभाषे-( प्रादेशिक भाषे ) व्यतिरिक्त किमानपक्षी कोणतीही एक प्रादेशिक भाषा भारतीयाने अवश्य शिकावी. अशा प्रकारे निरनिराळ्या प्रादेशिक भाषा जाणणाऱ्या निरनिराळ्या व्यक्ती ह्या आंतरप्रदेशीय सांस्कृतिक संबंध जोडणारे दुवे ठरतील. अशा व्यक्तीमार्फतच आपणास निरनिराळ्या प्रादेशिक सांस्कृतिक जीवनाचा प्रत्यक्ष सहवास घडेल आणि त्यातूनच भावनिक ऐक्यभाव वृद्धींगत होईल, दृढ होईल.










## राष्ट्रीय ऐक्य म्हणजे काय ?

जोडभाषेचा प्रश्न राष्ट्रीय ऐक्याच्या विचाराशी निगडीत असल्यामुळे त्याचाही याच संदर्भात विचार करावा लागतो. कोणत्याही सामाजिक प्रश्नाची सोडवणूक करताना त्याची राष्ट्रीय ऐक्याशी सांगड घालावी लागते हे जसे खरे तसेच कोणत्याही समस्येची योग्य व्यवस्था लागली गेली तरच राष्ट्रीय ऐक्य टिकून राहते हाही विचार दृष्टिआड होऊ नये. तेव्हा भाषिक समस्येच्या संदर्भात होत असलेला विचारविमर्श हा विघटनेला कारणीभूत होईल असे समजणे योग्य होणार नाही. परंतु ' भाषाप्रश्न सुटो वा न सुटो, राष्ट्रीय एकात्मतेचे संगोपन हे सर्वप्रथम महत्त्वाचे आहे ' यासारख्या विधानातून प्रगट होणारा अर्थ समजण्यास खरोखर कठीण आहे. खरे म्हणजे भाषाप्रश्नासारखे प्रश्न आणि राष्ट्रीय एकात्मता ह्या अन्योन्याश्रयी, परस्परावलंबी अशा घटना आहेत. राष्ट्रीय एकात्मतेसंबंधी आपला विचारकल्प निश्चित पायावर उभा टाकलेला असेल तर राष्ट्रीय समस्या सोडविण्यामध्ये तो आपणास दीपस्तंभाप्रमाणे दिशा दाखविणारा मार्गदर्शक ठरेल. प्रचलित विमर्शातून प्रगट होणारा राष्ट्रीय एकात्मतेचा विचार ग्रांथिक कल्पनातून उद्‌भूत झाला असावा असे वाटते. सामान्यतः असे सांगण्यात येते की एक धर्म, एक वंश, एक भाषा, समान इतिहास व सांस्कृतिक परंपरा यामुळे एकराष्ट्रीयत्वाची भावना निर्माण होते. या विचारधारेतूनच 'भारतीय एकात्मतेसाठी एका समान भाषेची आवश्यकता आहे ' हे सूत्र निष्पन्न झाले आहे. साधारणपणे जीवनातील विविध अंगोपांगांच्या बाबतीत एकसारखेपणा निर्माण करण्याने एकत्वाची भावना दृढ होऊ शकेल अशी ही धारणा आहे. परंतु भारतीय जीवनातील बहुविधतेतून एकसारखेपणा आणण्याचा प्रयत्न हा एकभाव प्रथापित करण्यास सहाय्यभूत होणार नाही. भारतीय जीवनातील बहुमुखी बहुविधतेची यथायोग्य जाणीव आपणास जसजशी होईल तसतसे ' एकसारखेपणा म्हणजे एकात्मता ' ह्या कल्पनागंडाचा आपण त्याग करू. भारतीय जीवनाच्या वैशिष्ट्यपूर्ण स्वरूपाला अनुरूप आणि लोकशाही मूल्यांना अनुसरून ' राष्ट्रीय एकात्मते ' संबंधीचा नवा विचारकल्प आपण घडविला पाहिजे. साधारणपणे असे म्हणता येईल की बहुविधतेचा पुरस्कार करून तिला नांदू देणे, उत्स्फूर्त सहकार्यावर व सहिष्णुतेवर अधिष्ठित अशा सहजीवनाची कास धरणे, निरनिराळ्या प्रादेशिक सांस्कृतिक जीवनपद्धतीचा मनःपूर्वक आदर करणे ही प्रवृत्ती राष्ट्रीय एकात्मता निर्माण करण्यास खऱ्या अर्थाने सहाय्यभूत होईल. 'बहुविधतेतून एकता' साधण्याच्या प्रयत्नात आपण बहुविधतेवर कोणत्यातरी प्रकारच्या 'एक सारखेपणाचे'च कलम तर करीत नाही ना याचे सतत भान राखले पाहिजे. बहुविधतेचा पुरस्कार म्हणजे फुटीरवृत्तीला प्रोत्साहन असे मानण्याचे कारण नाही. कारण बहुविधतेच्या खऱ्याखुऱ्या पुरस्कारात परस्परातील सांस्कृतिक संबंधांची उत्स्फूर्त देवाणघेवाण अनुस्यूत असल्याचे अभिप्रेत आहे. शिवाय असेही म्हणता येईल की कोणत्याही सांस्कृतिक अंगाच्या 'एकसारखेपणा'ला सामाजिक-सांस्कृतिक दृष्ट्या निरपेक्ष केवलमूल्य नसते. म्हणून असे वाटते की आपण एक भाषा, एक धर्म यासारख्या एकतेच्या कल्पनेने वाहावून जाऊ नये. कायद्याने काय किंवा शिक्षणाच्या द्वारे काय आपण एकसारखेपणातून भासमान होणारी वरवरची, कृतक एकता निर्माण करण्याचा अट्टाहास करू नये. भाषिक धोरणाची रूपरेषा आखताना आपण बहुभाषी आहोत व तसे राहण्यातच आपले खरेखुरे सुख दडलेले आहे याची आपण सतत जाणीव ठेवावी. अतएव, ' बहुविधतेतून एकता म्हणजे एकसारखेपणा ' असे नव्हे तर ' बहुविधतेचेच शांततामय उत्स्फूर्त सहकार्यपूर्ण सहजीवन ' असेच आपल्या भारतीय एकात्मतेचे स्वरूप राहील हे आपण सतत ध्यानात ठेवावे.

## इंग्रजीच्या दास्याचे जोखड

भारतीय जीवनात इंग्रजी भाषेचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण असे आहे. आधुनिक भारताचे भरणपोषणच मुळी इंग्रजी ह्या वाघिणीच्या दुधावर झाले आहे, असे म्हटले तर ते अतिशयोक्त ठरू नये पारलौकिक कल्याणाकडे डोळे लावून ऐहिक जीवनाची उपेक्षा करणाऱ्या मध्ययुगीन जीवनांधःकारातून प्रवृत्तीधर्माची रग निर्माण करून इहवादाचा पुरस्कार करणाऱ्या पुरोगामी भारताचे नवनिर्माण करण्याचे श्रेय बव्हंशी इंग्रजीकडेच जाते हे










मान्य करण्यात खळखळ करणे हे खरोखर कृतघ्नपणाचे ठरावे. आधुनिक भारताला नवजन्म देणाऱ्या प्रतिजननीच अशा इंग्रजीचे आपण नेहमी ऋणी राहिले पाहिजे. परंतु आधुनिक जीवन घडविणारे शोध किंवा विचार यांच्या तत्कालीन भारतीय जीवनातील अभावामुळे, या पार्श्वभूमीवर देदिप्यमान व ऐश्वर्यशाली वाटणाऱ्या इंग्रजी सांस्कृतिक जीवनाच्या लखलखाटामुळे, इंग्रजीच्या श्रेष्ठतेसंबंधीच्या अहंगंडाने पछाडलेल्या मेकॉलेसारख्या काही गर्वाढ्य इंग्रजांच्या अप्रतिहत अपप्रचारामुळे आणि शेदीडशे वर्षांच्या पारतंत्र्यकालातील इंग्रजी जीवन-पद्धतीची व विचारसरणीची सवय सतत अंगवळणी पडल्यामुळे भारतीय जीवनमानसात न्यूनगंडाच्या ग्रंथी निर्माण झाल्याचे आपल्या प्रत्ययास येते. सांप्रत भाषिक ध्येयधोरणांची पुनर्रचना करताना इंग्रजीचा जीविताधार सोडून देणे जुन्या पिढीतील कित्येक इंग्रजीच्या अभिमान्यांना मोठे कष्टदायक वाटत आहे. इंग्रजीने गेली कित्येक वर्षे बौद्धिक जीवनात, कायदेकानू व न्यायदानपद्धतीत आणि शासकीय व्यवहारात ऐक्य प्रस्थापित करून सुव्यवस्था निर्माण केली आहे असा एक विचार मांडला जातो. वास्तविक पारतंत्र्यकालात भारतीय ऐक्य टिकविण्याचा प्रश्नच उद्‌भवत नव्हता. आणि त्यावेळची शांतता व सुव्यवस्थेची स्थिती ही ऐक्याची निदर्शक नव्हती तर जबरदस्तीने लादलेल्या परि-स्थितीतून निष्पन्न झालेल्या उदासीन निस्तेजतेची होती. स्वातंत्र्याच्या काळातही जनतेच्या सर्जनशील-तेला उधाण आणणाऱ्या, शिक्षणाचा दर्जा वाढविणाऱ्या, शिक्षण जनसामान्यांच्या आवाक्यापर्यंत पोचविणाऱ्या आणि बुद्धिमंत व सामान्य यांच्यातील अंतर कमी करणाऱ्या प्रादेशिक भाषामाध्यमापेक्षा निर्जीव, निष्प्रभ शांतता निर्माण करणारे इंग्रजी माध्यमच बरे असे म्हणणे, यासारखी पराभूत मनोवृत्ती दुसरी दाखविता येणार नाही. इंग्रजी ही एकमेव जागतिक भाषा आहे आणि ज्ञानविज्ञानाच्या अफाट विश्वाचे दर्शन घड-विणारी ती खिडकी आहे, हा मागासलेला विचार आता कदाचित इंग्रजांना देखील मान्य होणार नाही. इंग्रजी ही एक संपन्नसमृद्ध भाषा आहे हे निर्विवाद खरे आहे. पण तिच्याशिवाय आम्ही उघडे पडू, आमचे भागणार नाही ही वृत्ती मात्र स्वत्वाभिमानशून्य व राष्ट्रोत्कर्षाला विघातक अशीच आहे. इंग्रजीशिवाय शिक्षणाचा उच्च दर्जा खालावेल, शासकीय व्यवहार विस्कळीत होतील, विज्ञान व तंत्रविद्येच्या बाबतीत आपण मागे पडू असे म्हणणे इंग्रजी अंमलपूर्वी भारतात कधी सुवर्णयुगे निर्माण झाली होती हे नाकारण्यासारखेच होय. विद्यमान काळात इंग्रजीशिवाय प्रबळ व संपन्न राष्ट्रनिर्मिती झाल्याचे दाखविता येणार नाही काय ? तेव्हा इंग्रजीचे महत्त्व व तिचे आपल्या जीवनातील योग्य स्थान समजून-उमजून घेऊन तिच्यासंबंधीच्या आत्मविश्वासशून्य दास्यवृत्तीचा आपण जितक्या लवकर त्याग करू तितकी ती आपल्या उत्कर्षाला सहाय्यभूत होईल.

## आंतरराष्ट्रीय संबंध

प्रचलित विज्ञान व तंत्रविद्या यांच्या अफाट शोधा-मुळे जगातील बहुतेक राष्ट्रांना या ना त्या स्वरूपात परस्परावर अवलंबून राहावे लागत आहे. राजकीय धोरणे, औद्योगीकरण, आधुनिक तंत्रज्ञान याबाबतीतच केवळ नव्हे तर कला-वाङ्मय, सामाजिक शास्त्रांतील नवविचार यासारख्या सर्व पातळीवरील सांस्कृतिक संबंधाबाबतही देवाण घेवाण करणे ही आजची आत्यंतिक गरज झाली आहे. स्वसंरक्षण आणि स्वत्वसंवर्धन यासाठी आंतरराष्ट्रीय संबंध प्रस्थापित करणे हे आजच्या यंत्रयुगा-मुळे प्रत्येक राष्ट्राला भाग पडत आहे. चालू शतकात झालेल्या क्रान्तीकारक चळवळीमुळे जगातील अनेक राष्ट्रांत स्वातंत्र्याचे वातावरण निर्माण झाले. आणि निरनिराळ्या मार्गांनी प्रभावी राष्ट्रनिर्मितीच्या कर्तृत्वाला उधाण आले. त्यामुळे त्या कर्तृत्वाच्या वाचक अशा भाषाही महत्पदास पोहोचल्या. जागतिक सांस्कृतिक जीवनात त्या मोलाची भर घालू लागल्या. प्रगमनशील जीवनविकासासाठी त्यांचा परिचय व अभ्यास सर्वत्र आवश्यक वाटू लागला. त्यांना जागतिक भाषेचे मह-त्त्वाचे स्थान प्राप्त झाले. रशियन, फ्रेंच, जर्मन, स्पॅनिश, चिनी, जपानी यासारख्या भाषांचा अंत-र्भाव अशा जागतिक भाषांमध्ये केला जातो. इंग्रजी ही तर पूर्वापार जागतिक भाषा म्हणून ओळखली जाते. शेकडो वर्षांच्या स्वातंत्र्यामुळे निरनिराळ्या क्षेत्रात साहित्यनिर्मिती करण्याची संधी इंग्रजीला लाभ-ल्यामुळे ती एक सर्वतोपरी समृद्ध भाषा झाली आहे. आणि ब्रिटिशांच्या दीर्घकालाच्या सहवासामुळे आप-








णाला इंग्रजी ही एकच भारतीयेतर भाषा ज्ञात झाली आहे. म्हणून कित्येकांना असे वाटते की केवळ इंग्रजी हीच जागतिक संबंधासाठी पुरेशी आहे. परंतु अलिकडील काळात जर्मन, रशियन यासारख्या काही भाषांनी अतिशय वेगाने सर्वक्षेत्रात अमाप प्रगति केली आहे. म्हणून इंग्रजी इतकाच त्यांचाही अभ्यास विकसनशील देशांना, आवश्यक झाला आहे. तेव्हा आंतरराष्ट्रीय समज, आधुनिक ज्ञानविज्ञान, कलावाङ्मय यातील विकासाकरिता जगाशी संबंध जोडण्यासाठी भारतीयांनी इंग्रजी, जर्मन, रशियन, फ्रेंच, जपानी यासारख्या भाषांपैकी किमानपक्षी कोणतीही एक भाषा अवश्य शिकावी. सध्यातरी आपली परंपरा इंग्रजीची आहे. शिक्षणात व शिक्षकांवर इंग्रजीचे संस्कार झालेले आहेत. देशात इंग्रजीतील ग्रंथसंपत्ती जास्त प्रमाणात उपलब्ध आहे. म्हणून इंग्रजीचा अभ्यास भारतभर कसोशीने केला जावा हे खरे. परंतु केवळ इंग्रजीवरच विसंबून न राहता, तीच सर्वप्रकारच्या आंतरराष्ट्रीय संबंधाकरिता परिपूर्ण आहे असे न मानता इतर भारतीयेतर भाषांचाही परिचय आपण तत्परतेने करून घ्यावा. यासाठी भारतभर लहानमोठ्या शहरांतून इंग्रजीबरोबर इतर भारतीयेतर भाषांच्या शिक्षणाची केंद्रे अधिकाधिक प्रमाणात स्थापन करावीत. केंद्र व घटक राज्यांनी या निरनिराळ्या भारतीयेतर भाषाशिक्षणाला सक्रीय प्रोत्साहन द्यावे.

## सदोष शिक्षणपद्धतीचा परिपाक

भाषाप्रश्न हा देशाच्या शिक्षणपद्धतीशी अपरिहार्यपणे निबद्ध असतो. प्रचलित कालबाह्य शिक्षणपद्धती ही भाषाप्रश्नात गैरसमजाची व दुराग्रहाची गुंतागुंत निर्माण करण्यास आणि अराजक माजविण्यास बरीचशी कारणीभूत आहे. ' भाषिक धोरणातील चूक लवकर दुरुस्त होत नाही. तिचे परिणाम एका पिढीला भोगावे लागतात ' असे जे मत उच्चपदस्थ जाणकारांकडून व्यक्त केले जाते त्याला कारण आपली एकांगी, एकसुरी, साचेबद्ध शिक्षणरचनाच होय. शिक्षण व्यवस्था ही सर्जनशीलतेला भरपूर वाव देणारी व कालमानानुसार बदलणारी लवचिक अशी असावी लागते. सामान्यतः लोकांच्या ठायी वसत असणाऱ्या शारीरिक, मानसिक व बौद्धिक सुप्त गुणांचे संशोधन व स्थूल मापन व्हावे लागते. आणि या गुणांच्या उत्कर्षासाठी तदनुरूप शिक्षणक्रमांची योजना करावी लागते. व्यक्तिगत गुणांची क्षमता व व्यवसायानुसार आवश्यकता यावरच खरे म्हणजे कोणकोणत्या, किती व कोणत्या पातळीवर भाषा शिकाव्यात हे अवलंबून आहे. जनसामान्यांची बौद्धिक कुवत सामान्य पातळीवर असल्यामुळे सर्वसाधारण ऐंशी टक्के समाज मर्यादित परिसरातच राहात असतो आणि रूढ, परिचित असा जीवनमार्गच पत्करीत असतो. अशा सामान्यांसाठी प्रादेशिक भाषा व लिहिलेले - बोललेले समजण्यापुरते, कामचलाऊ ज्ञान मिळविण्यासाठी इतर भाषा यांचे कमी अधिक कालावधीचे अभ्यासक्रम आखावेत. तंत्रविद्येतील साधेसुधे कौशल्य प्राप्त करून देणारे विविध भाषेतील अभ्यासक्रमही त्यांच्यासाठी चालू करावेत. सामाजिक- वैज्ञानिक शास्त्रांतील उच्च ज्ञान, संशोधन, आंतरराष्ट्रीय सांस्कृतिक संबंध या क्षेत्रात कार्य करणाऱ्या व्यक्तींचे प्रमाण सुमारे पाचदहा टक्केच असते. अशा तीव्र बुद्धीमत्ता, कलागुण असणाऱ्यांना आवश्यकतेनुसार बहुभाषी व्हावेच लागते. अनेक भाषा शिकण्याने त्यांच्या बुद्धीवर ताण पडत नसतो. शिवाय अशा व्यक्तींनी किती व कोणत्या भाषा शिकाव्यात हे सर्वस्वी त्यांच्या कार्यक्षेत्राच्या गरजेनुसारच ठरत असते. त्यांच्या सर्जनशीलतेला अनुरूप कमीअधिक दर्जा व पातळीवरील अभ्यासक्रमांची योजना करणे एवढेच सरकारचे कर्तव्य ठरते. अशाप्रकारे कमीअधिक कालमानाच्या व निरनिराळ्या पातळी-दर्जाच्या विविध भाषातील, तंत्रविद्येतील व उच्च कलाविज्ञानातील अभ्यासक्रमांची आखणी करून त्यांची योग्य श्रेणी लावावी आणि त्यांना सरकारी मान्यता द्यावी. सामाजिक समता प्रस्थापित करताना समाजाची बौद्धिक पातळी कमी जास्त राहाणारच याचे सतत भान ठेवावे लागते. म्हणून सर्वांसाठी सरधोपट एकच एक शिक्षणक्रम व भाषासूत्र लागू करण्याचा अट्टाहास आपण करता कामा नये.

## त्रिभाषासूत्रच--पण वेगळे

येथवरच्या विवेचनाचा मतितार्थ असा : ( १ ) मातृभाषा वा प्रादेशिक भाषा हेच शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षणाचे माध्यम असावे. कारण मातृ-








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भाषेतूनच सर्व प्रकारचे ज्ञानविज्ञान आकलनसुलभ होत असते. म्हणूनच मातृभाषेचा अभ्यास उत्स्फूर्तपणे होत असतो आणि त्यातूनच व्यक्तिगुणांचा उत्कर्ष होतो. (२) आंतरप्रांतीय सर्व प्रकारच्या सांस्कृतिक संबंधाकरिता विद्यार्थ्याने स्वतःच्या प्रादेशिक भाषेशिवाय कोणत्याही एका भारतीय भाषेची निवड करावी. केवळ हिंदीची सक्ती केल्यास मतभेद उत्पन्न होतात. हिंदीबरोबर भारतीय भाषांनाही समान वागणूक मिळावी. (३) सद्यकालीन जागतिक परिस्थतीचा परिचय करून घेऊन आंतरराष्ट्रीय सांस्कृतिक संबंध जोडण्यासाठी विद्यार्थ्यांनी आपल्या कुवतीनुसार इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, रशियन, जपानी, स्पॅनिश, चिनी यापैकी कोणत्याही एका भाषेची निवड करावी. केवळ इंग्रजीवरच विसंबून राहिल्यास आपल्या ज्ञानात निश्चितच एकदेशीयपणा येईल. म्हणून केंद्र व घटक सरकारांनी सर्व भारतीय भाषांच्या व काही प्रमुख भारतीयेतर भाषांच्या शिक्षणाची केंद्रे जागोजाग स्थापन करण्याची त्वरा करावी.

उपरिनिर्दिष्ट ' त्रिभाषा-सूत्रांचा पुरस्कार व अवलंब प्रचलित भाषा-समस्या सोडविण्यास बऱ्हंशी साहाय्यभूत होईल असा विश्वास वाटतो.

---










# सार-संकलन

## विध्वंसक

स्वित्झरलंड हे एक नमुनेदार एकजिनसी राष्ट्र म्हणून समजण्यात येते. परंतु या राष्ट्राच्या राष्ट्रीयत्वाला बाध आणणारी एक गोष्ट आहे व ती म्हणजे या सबंध राष्ट्राची अशी एक भाषा नाही. अलीकडे मात्र एक, सर्वांना समजणारी भाषा या राष्ट्रात शिरकाव करू पहात आहे आणि स्विस लोकांच्या मते ती भाषा राष्ट्रीय भाषा होणे चूक आहे.

स्वित्झरलंडमध्ये जर्मन, फ्रेंच, इटालिअन व रोमोनॅश या चार राष्ट्रीय भाषा आहेत परंतु सत्तर टक्के लोक स्विस्-जर्मन भाषा बोलतात; व वीस टक्के लोक फ्रेंच भाषा वापरतात. याचा परिणाम असा होतो की बाजवी पेक्षा जास्त स्विस लोक फ्रेंच व जर्मन या दोन्ही भाषा सहज वापरू शकतात. दोन्ही भाषा चांगल्या येणे व या पैकी कोणतीही एक आपली म्हणणे अनेकांना शक्य असणे यातच स्वित्झरलंडच्या ऐक्याचे गुपित आहे. पण स्विस पोस्टल सर्व्हिसच्या डायरेक्टरने अलीकडे या राष्ट्राला जागे करण्याचा प्रयत्न केला आहे. श्री. ड्युक्रोमन याचे म्हणणे असे की, हे जर्मन-फ्रेंच द्विभाषिक, एक भाषिक राष्ट्र बनत असून या जुन्या दोन भाषांची जागा इंग्रजी घेत आहे. इंग्रजी स्वित्झरलंडची पाचवी राष्ट्रभाषा होऊ पहात आहे व त्यामुळे या राष्ट्राचे ऐक्य धोक्यात आहे. राष्ट्रीय भाषांची प्रतिष्ठा कमी होत आहे.

श्री. ड्युक्रोमन यांनी दिलेला इषारा अगदीच अनाठाई नाही. आज स्वित्झरलंडला एका राष्ट्रीय भाषेची गरज आहे. आतापर्यंत या द्विभाषिक राष्ट्रातील भाषिक गट वेगवेगळे रहात असत. परंतु अलीकडे दळणवळणाच्या साधनातील क्रान्तीमुळे समाज एकमेकात मिसळत आहेत. त्यातच मोठ्या संख्येने येणाऱ्या परकीय कामगारांची भर पडत आहे. यात इटालिअन लोकांचा भरणा पुष्कळ आहे. त्यामुळे नुसत्या फ्रेंच व जर्मन भाषांवर अवलंबून रहाणे व्यावहारिक दृष्ट्या जमेनासे होत आहे.

शासनाच्या पातळीवर जुने नियमच पाळले जातात परंतु अनेकांना इंग्रजी भाषा वापरणे जास्त सोईचे वाटत आहे. यामुळे एक महत्वाचा फायदा आहे व तो म्हणजे राष्ट्रीय भाषांपैकी कोणत्याही एका भाषेचे वर्चस्व प्रस्थापित होत नाही. स्विस-जर्मन किंवा फ्रेंच या दोन्ही भाषांत असे काही दोष आहेत की त्या दोन्हीपैकी कोणतीही भाषा राष्ट्रभाषा होऊ शकणार नाही. स्विस-जर्मन ही भाषा बोलभाषा असून ती निरनिराळ्या स्वरूपात निरनिराळ्या ठिकाणी बोलली जाते. प्रत्यक्ष जर्मन भाषेपेक्षासुद्धा या पोटभाषा बऱ्याच वेगळ्या आहेत. स्विस-फ्रेंच भाषेत शास्त्रीय व तांत्रिक शब्दांचे दुर्भिक्ष असून ती शैक्षणिक दृष्ट्या वापरणे कठीण आहे.

इंग्रजीचा वाढता वापर शिक्षणसंस्थांनी मान्य केलेला दिसत आहे. फ्रेंच किंवा जर्मन या भाषा प्रत्येक स्विस शाळेत सक्तीच्या दुय्यम भाषा आहेत. परंतु विश्वविद्यालयीन शिक्षणाचा पाया घालणाऱ्या माध्यमिक शाळातून इंग्रजी सक्तीचे आहे. माध्यमिक शाळातून बाहेर पडणाऱ्या एकतृतीयांश विद्यार्थ्यांना इंग्रजी येत असले तरी उच्च शिक्षणाकरता इंग्रजी येणे अत्यावश्यक आहे. स्विस लोकात इंग्रजी जास्त लोकप्रिय होत असली तरी त्यात ब्रिटिश हात आहे हे स्पष्ट आहे. स्वित्झरलंडचे प्रवासी मार्केट इंग्लंडशी निगडित आहे. ब्रिटिश लोक आपल्या घरी स्विसमुलींना रहाण्याची संधी देऊन त्यांना इंग्रजी शिकण्यास मदत करीत आहेत. त्याचप्रमाणे तांत्रिक शिक्षणाकरता व प्रात्यक्षिकाकरता अनेक स्विसविद्यार्थी इंग्लंडमध्ये येत आहेत. शेवटी इंग्रजी भाषा अमेरिकेशी व्यवहार करण्यास पण उपयोगी ठरते हे विसरता येत नाही.

हे सर्व खरे असले तरी श्री. ड्युक्रोमन यांची भीती निराधार आहे. स्वित्झरलंडचे राष्ट्रीय ऐक्य बिलकूल धोक्यात नाही इंग्रजीच्या आक्रमणाने त्याचा विध्वंस होणार नाही. इंग्रजीच्या अभ्यासामुळे आपल्या राष्ट्रीय भाषेपैकी एखादीलाच वर उचलण्याची व इतरांच्या प्रतिष्ठेला धक्का लावण्याची, गरज स्वित्झरलंडला आज



अनुक्रमणिका






राहिली नाही. इंग्रजी ही परकी भाषा असली तरी ती स्वित्झरलंडची, एकत्रीकरणाची, एकमेव भाषा होऊ शकेल. या भाषेला विध्वंसक म्हणणे बरोबर होईल का?

दि इकॉनॉमिस्ट, लंडन २८–१०–६७.

## पाश्चिमात्त्य भांडवलाला बगल

हलदिया, प. बंगाल येथे भारत, फ्रान्स व रुमानिया या दोन राष्ट्रांच्या साहाय्याने अडीच मिलियन टन तेल शुद्ध करण्याचा कारखाना बांधीत आहे. कलकत्ता बंदरातील गर्दी कमी करण्याकरता प. बंगालमध्ये दुसरे मोठे बंदर बांधण्याचे काम सुरू झालेले आहे. फ्रान्सने या कारखान्यात ७ मिलियन पौंड गुंतविण्याचे ठरवले असून त्याच्या बदल्यात भारताने या कारखान्याला लागणारे पन्नास टक्के क्रूड ऑईल इराणच्या आखातातील फ्रेंच कंपनीकडून विकत घ्यावयाचे आहे. बाकीचे राहिलेले भांडवल रुमानिया या नाही त्या स्वरूपात गुंतविणार आहे. हा कारखाना भारत सरकारच्या मालकीचा राहील व तो चालविण्याचा खर्च पण भारत सरकार करील.

हलदिआचा कारखाना भारतातील इतर कारखान्यांपेक्षा दोन बाबतीत वेगळा आहे. एक तर, पूर्व युरोपियन व पश्चिम युरोपियन भांडवल एकत्र येऊन कारखाना काढण्याची ही पहिलीच वेळ आहे. १९६० साली रुमानियाने आसाममध्ये एक लहान तेलशुद्धीकरणाचा कारखाना बांधला आहे. परंतु या वेळी मात्र त्यांनी फ्रेंच तंत्रविशारदांना पाचारण करून त्यांच्या ज्ञानाचा उपयोग करून घेण्याचे ठरविले. कदाचित् अशा तऱ्हेचे त्रिपक्षी कारखाने उभारण्याची हलदिया ही सुरवात असेल. कारण फ्रान्स व पोलंड एकत्र येऊन मोठा खत कारखाना निघण्याची व पूर्वजर्मनी व फ्रान्स एकत्र येऊन पेट्रोकेमिकल्सचा कारखाना निघण्याची शक्यता नजीकच्या भविष्यात आहे. व दुसरे म्हणजे पाश्चिमात्य राष्ट्राने अशा तऱ्हेचा कारखाना उभारताना त्यात भागिदारी मागितलेली नाही व सर्वच्या सर्व क्रुडऑईल पण आपल्याकडूनच घेतले पाहिजे अशी अट घातली नाही हेही नवीनच आहे. भारताच्या दृष्टीने हलदीया कारखाना फारच फायदेशीर अटीवर बांधला जात आहे.

क्रूडऑईलच्या कंत्राटाचे बदल्यात खत कारखाना उभारण्यास लागणारे भांडवल मिळविण्याचा सुरवातीस भारताचा मनोदय होता. आता खत कारखान्यास लागणाऱ्या नायट्रोजनच्या सवलतीबद्दलच्या वाटाघाटी फिलिप्स पेट्रोलियम या अमेरिकन कंपनीशी चालू आहेत. या वाटाघाटी यशस्वी झाल्यातरी भारताला अनेक खत कारखान्यांची गरज आहे. १९७० सालपर्यंत साडेतीन ते चार मिलियन टन खत भारताला लागणार आहे, तर अस्तित्वात असलेल्या कारखान्यांचे उत्पादन त्यावेळपर्यंत दोन मिलियन टनापर्यंत जाऊ शकेल. अनेक महत्त्वाकांक्षी योजना या बाबतीत आखण्यात येत असून सर्वात महत्त्वाची योजना टाटा कंपनीची आहे. या कारखान्यात शंभर मिलियन पौंडांचे भांडवल गुंतविण्याची तयारी असून त्यातून दरसाल एक मिलियन टन खते तयार होतील अशी योजना आहे. गुजराथमधील समुद्रकाठचे एक ठिकाणही यासाठी पसंत करण्यात आले आहे.

या प्रचंड योजनेचा खत कारखाना हा एक भाग असून सल्फर, पोटॅश व इतरही अनेक रासायनिक द्रव्ये समुद्रातून पैदा करण्याचा टाटा कंपनीचा मानस आहे. या योजनेच्या पूर्ततेसाठी अल्पखर्चात चालणारे एक लहानसे अणुकेंद्र उभारले जाण्याची शक्यता असून त्यायोगे दररोज शंभर मिलियन गॅलन शुद्ध पाणी आजूबाजूच्या उजाड जमिनीस पुरविण्याची योजना पण आहे. परंतु या सर्व प्रकल्पात एक फार मोठी मेख आहे. ही योजना अलाइड केमिकल्स या अमेरिकन कंपनीच्या मदतीवर अवलंबून आहे. या योजनेस लागणारे सर्व परकीय चलन या कंपनीने पुरवावयाचे असून त्या बदलात त्यांचे इराणातील कारखान्यात तयार होणारा अमोनिया विकत घ्यावयाचा आहे. परंतु जागतिक बँकेचे अध्यक्ष श्री. जार्ज वुडस् यांचा अमोनियाच्या आयातीस विरोध आहे. भारत सरकारने कुवेतशी होणारे एक कंत्राट याच गोष्टीमुळे रद्द केले. टाटाच्या वाटेत हाच अडथळा उभा राहण्याची शक्यता आहे. टाटाच्या योजनेप्रमाणे अमोनियाची आयात फक्त सुरवातीसच करावी लागणार असून त्यानंतर अणुशक्तीच्या वापराने भारतात अमोनियाचे उत्पादन सुरू होण्यास विलंब लागणार नाही. परंतु इराणी कारखान्यातील अमोनिया विकत घेण्याची योजना भारतीय लोकसभेच्या गळी उतरवणे म्हणजे सोपी गोष्ट नाही.

–दि इकॉनॉमिस्ट, लंडन २८-१०-६७



अनुक्रमणिका






## चीनचे नैतिक धैर्य

माओने आपल्या चळवळीने चीनच्या नैतिक धैर्यास धडा दिला नसला तरी चीन आपल्या चुकांची दुरुस्ती सहज करू शकेल. एक महिन्याच्या उशीराने का होईना पण कॅन्टनची शारदीय जत्रा सुरू झाली आहे. या जत्रेच्या स्वरूपावरून लालरक्षकांनी चीन-मध्ये किती विध्वंस केला आहे हे समजणे शक्य होईल. कॅन्टनची जत्रा दुसऱ्याही एका कारणाकरता महत्त्वाची ठरणार आहे. सबंध उन्हाळाभर लालरक्षकांनी देशभर धुमाकूळ घालून नेहमीच्या व्यापाराची घडी विसकटून टाकली होती. ती पुन्हा बसवण्यास या जत्रेमुळे मदत होणार आहे वासंतिक जत्रेच्या वेळी ४०० ते ५०० मिलियन डॉलर्सची देवाणघेवाण झाली होती.

या वेळीही बराच मोठा व्यापार होण्याची शक्यता आहे. सांस्कृतिक क्रान्तीमुळे किती नुकसान झाले आहे हे लक्षात येण्यासारख्या गोष्टी या व्यापारात होण्याची शक्यता आहे. निर्यातीचे वायदे करताना माल पोचव-ण्याची नक्की तारीख चीन सांगू शकेल का ? नेहमीच्या ऑर्डर्सच्या बाहेरच्या ऑर्डर्स् घेण्यास चीन उत्सुक आहे का ? परकीय चलनाचे बाबतीत मागच्यापेक्षा जास्त क्रेडिट मागितले जाईल का ? या जत्रेवर राज-कारणाची घनदाट छाया पडलेली असेल हे मात्र निश्चित. जत्रेची आमंत्रणे 'मित्र' कंपन्यांनाच पाठ-विण्यात आलेली आहेत.

गेले काही महिने चीनचे व्यापाराकडे लक्ष नाही असे वाटते. जून महिन्यापर्यंत सांस्कृतिक क्रान्तीचा कशावरही परिणाम झालेला नव्हता. त्यानंतर मात्र चीनी व्यापारात गोंधळ होण्यास सुरवात झाली. दिलेली कोणतीही तारीख चीनला पाळता येईना. माल घेऊन येणाऱ्या जहाजांना आठवडे न् आठवडे माल उतरता येईना. ज्या जहाजांनी मालाची देवाणघेवाण करण्याची कंत्राटे घेतली होती ती रिकामी परत येऊ लागली. काही आर्डरी रद्द करण्यात आल्या तर चीनच्या सर्वात महत्त्वाच्या आयात मालाची- खताची आयात स्थगित करण्यात आली. या सर्वाचे कारण सापडणे कठीण आहे. पण ऑगस्ट सप्टेंबर पर्यंत परि-स्थिती पार बिघडली व चीनचा व्यापार जवळ जवळ थांबण्यापर्यंत आला. आतापर्यंत खात्रीलायक समजल्या जाणाऱ्या सर्व चिनी कंपन्यांच्या प्रतिष्ठेला धक्का बसला. अनेक व्यापारी शिष्टमंडळे व व्यक्तिगत व्यापारी वैफल्याची भावना घेऊन परत आले. काही वेळा दैनंदिन व्यापार जेमतेम चालू ठेवण्यात चीनला यश मिळाले पण नव्या योजना व नवे कारखाने मूर्त स्वरूपात येणे अशक्य आहे.

परंतु या सर्वातून काहीही निष्कर्ष काढणे कठीण आहे. कारण १९६७ म्हणजे १९६० नव्हे. त्यावेळी चीनी उद्योगधंदे अर्धवट अवस्थेत होते. त्यामुळे 'प्रचंड झेपे' चा परिणाम व सांस्कृतिक क्रान्तीचा परिणाम वेगवेगळा होणे साहजीकच आहे. चीनचा परकीय व्यापार हा चीनी अर्थव्यवस्थेतील एक लहानसा भाग आहे हे विसरून चालणार नाही व त्यातही झालेला गोंधळ वहातुकीत आलेल्या विस्क-ळितपणामुळे होणे शक्य आहे.

१९६६ साली चीनच्या विकासात एकदम खंड पडला हे मात्र निश्चित. संप, कारखान्यातील यंत्रांचे नुकसान व महत्त्वाच्या वस्तूंच्या पुरवठ्यातील अडथळे या सर्वाचाच परिणाम उत्पादनावर झाला. त्यातच सांस्कृतिक क्रान्तीचे लोण कारखान्यापर्यंत पोचविण्याचा प्रयत्नपण काही काळ करण्यात आला. उन्हाळयात या क्रान्तिकारकांनी सर्वत्र बराच धुमाकूळ घातला. अनेक औद्योगिक शहरांना त्याची झळ पोचली. वाहातुकीत आलेल्या अडथळयामुळे बऱ्याच कारखान्यांना कच्चा माल वेळेवर पोचला नाही. कोळशाचे उत्पादन व वाटप यात गोंधळ निर्माण होऊन तेलाच्या वापरावर निर्बंध घालण्याची वेळ आली.

या सर्व नाट्यपूर्ण घटनात सत्यांश किती आहे व त्यांचा प्रत्यक्षात काय परिणाम झाला हे समजणे कठीण आहे. उत्पादनात काही भयंकर घट झाली आहे असे आज तरी वाटत नाही. वहातूक पण हळूहळू पूर्व-परिस्थितीवर येत आहे असे वाटते. कामगार बहु-संख्येने कामावर परतत आहेत. ही परिस्थिती तात्पुरती आहे की हा बदल कायम झाला आहे हे सांगणे मात्र कठीण आहे.

माओवाद्यांनी या सर्व गोंधळातसुद्धा दोन मह-त्त्वाची पथ्ये पाळली आहेत. एक तर उत्पादनासाठी










देऊ केलेले आर्थिक प्रोत्साहन त्यांनी बंद केलेले नाही. व दुसरे म्हणजे क्रान्तीचे लोण ग्रामीण भागापर्यंत पोचू दिले नाही. व त्यामुळे शेतीच्या उत्पादनावर सांस्कृतिक क्रान्तीचा काहीही परिणाम झालेला नाही. शेतकऱ्यांनी आपली खाजगी शेती स्वतःच पिकविली आहे. यंदा पाऊसपाणी पण चांगले असून १९६४ पेक्षा कितीतरी चांगली पिके निघाली आहेत.

व्यापार, वहातूक व उत्पादन यांचेवर झालेला सांस्कृतिक क्रान्तीचा परिणाम जर दुरुस्त होणे कठीण असले तर पक्षसभासद व तज्ञ यांच्या प्रतिष्ठेला बसलेला धक्का भरून येणे कठीण होणार आहे. म्हणजेच शेतकऱ्यांचेकडून धान्य गोळा करून त्याचे शहरात वाटप करणे कठीण होणार आहे. या परिस्थितीची कल्पना कॅनडाशी सुरू होणाऱ्या गव्हाच्या आयातीबद्दलच्या वाटाघाटींवरून समजून येईल. या महिन्याच्या शेवटी या वाटाघाटी होतील असे वाटते.

शास्त्रीय विषयातील तज्ञ पदवीधरांच्या शिक्षणातही सांस्कृतिक क्रान्तीने अडथळे आणले. त्यामुळे नष्ट झालेली शिस्त, उत्पादनक्षेत्रात निर्णय घेणाऱ्या तंत्रज्ञांची तुटलेली साखळी या सर्वांचा परिणाम अर्थव्यवस्थेवर झाल्याखेरीज रहाणार नाही.

एकदा हात भाजल्यामुळे पक्षसभासद कोणतीही जबाबदारी घेण्यास चटकन धजावत नाहीत. तर अपराधाची क्षमा करून ते विसरून जाण्याची सामान्यमाणसांची तयारी दिसत नाही. चीनी नेत्यांची आपल्या राष्ट्राच्या विकासासंबंधीची महत्त्वाकांक्षा दांडगी आहे. त्यांत काही वर्षांचा विलंब म्हणजे मामुली बाब नाही. गेल्या महिन्यात 'क्रान्तीचा, उत्पादनावर होणाऱ्या परिणामाची नेत्यांना कल्पना होतीच व क्रान्तीसाठी तेवढी किंमत देण्यास ते तयार होते' असे चाउ एन लाय यांनी उद्गार काढले होते. ही किंमत देण्यास आता माओही तयार आहेत असे वाटते.

—दि इकॉनॉमिस्ट लंडन १८, नोव्हेंबर १९६७

## दुसऱ्या दिवशी सकाळी

सुवर्णमहोत्सवाची समाप्ती झाली. ऐतिहासिक संचलन झाले, दारूकामाने मॉस्को शहर उजळून निघाले. क्रान्तीच्या पन्नासाव्या वाढदिवसानिमित्त मजेत नाचणारे, गाणारे, पिणारे व भटकणारे रशियन नागरिक पुन्हा कामाला लागले. त्यांचे नेतेही पूर्ववत् कामात गढून गेले. या उत्सवातून भविष्यासंबंधी कोणते मार्गदर्शन झाले?

दर वर्षी होणाऱ्या लष्करी संचलनात नव्या शस्त्रास्त्रांचे प्रदर्शन होते. यंदा आजचे लष्कर ऐतिहासिक पार्श्वभूमीवर दाखवले गेले. पन्नास वर्षांपूर्वीच्या कपड्यातील लाल लष्करातील पायदळ, घोडेस्वार, तोफखाना, राजकीय कमिसार, क्रान्तीला पाठिंबा देणारे व्यापारी या सर्वांचे दर्शन संचलनात झाले. रशियन नौदलातील सैनिकांनी व पॅराट्रुपर्सनी वापरलेल्या काळया व तांबड्या बेरे टोप्या नव्या रॉकेटस्‌पेक्षाही लक्षवेधी ठरल्या. या टोप्यांच्या निदर्शनास वेगळाच अर्थ लष्करी तज्ञ देत आहेत. माणसाशिवाय अवकाशयानात यश मिळवून व मॅकनमारा यांचे म्हणण्याप्रमाणे अवकाशबॉम्ब तयार करण्याच्या तयारीत असलेला रशिया अमेरिकेच्या बरोबरीने छोट्या मोठ्या लढायांत भाग घेणारे सैनिकही तयार करीत आहे असा या टोप्यांचा अर्थ आहे.

महोत्सवाचे वेळी झालेल्या एकाही भाषणावरून रशियाच्या परराष्ट्रीय धोरणात बदल झाल्याचे निदर्शनास येत नाही. पक्षाचे जनरल सेक्रेटरी लिओनिड ब्रेझनॉव्ह यांचे ३ नोव्हेंबरला मुख्य भाषण झाले. हे भाषण म्हणजे अनेकांनी बसून काटेकोरपणे तयार करून वक्त्याला त्यात बदल करण्याची कोठल्याही तऱ्हेची संधी न ठेवलेले भाषण वाटले. त्यात १९१७ सालच्या क्रान्तीचा उल्लेख होता. पण त्यातील एकाही प्रमुख नेत्याचा नामनिर्देश नव्हता. लाल लष्कराची स्थापना कशी झाली याचा इतिहास होता; पण त्याच्या संस्थापकाचा उल्लेख नव्हता. स्टालिनिझमबद्दल बोलताना स्टालीनचे नाव टाळले होते तर स्टालीननंतरच्या काळात निसिता क्रुश्चेव्हचे नाव घेतले गेले नाही. ब्रेझनॉव्हला खरी कसरत करावी लागली सद्यपरिस्थिती हाताळताना. मूलभूत उद्योगधंद्यांचे महत्त्व सांगतानाच अन्नोत्पादन व गिऱ्हाइकी वस्तूंच्या उत्पादनाचे विशेष महत्त्व प्रतिपादण्यात आले. शेतीमध्ये भांडवल गुंतविण्याची कल्पना बहुतेक रशियन नेत्यांना पसंत नसूनसुद्धा भाषणात शेतीवर जोर देण्यात आला.

राजनैतिक विषयात ब्रेझनॉव्हने अमेरिकेच्या व्हिएटनाममधील धोरणाबद्दल कडक शब्दात निषेध










व्यक्त केला. परंतु या धोरणाविरुद्ध आपली योजना काय हे सांगण्याचे त्याने टाळले व त्याच वेळी सहजीवन हेच रशियाच्या परराष्ट्रीय धोरणाचे सूत्र असल्याचे घोषित केले. चीनबद्दलपण चालू विचारच पुढे मांडले. माओगटावर टीका करून चीनच्या सुपुत्रांनी समाजवादाच्या स्थापनेकरता चालवलेली चळवळ यशस्वी होवो अशी इच्छा प्रदर्शित केली. व सध्या चीनमध्ये चालू असलेली यादवी लवकर संपुष्टात येईल अशी इच्छा व्यक्त करीत असताच जगातील सर्व कम्युनिस्ट पक्ष जागतिक परिषदेला तयार असताना एखाद्या राष्ट्रासाठी वाट पहात बसण्यास रशिया तयार नाही असेही स्पष्ट बजावले.

कम्युनिस्ट शिखरपरिषदेतील अडथळे मात्र अजून दूर झाले नाहीत. मॉस्कोत जमलेले सर्व कम्युनिस्ट नेते प्रतिष्ठितपणे वावरत होते. त्यातील बहुतेक सर्वांनी शिखरपरिषदेचे स्वागत केले तरी मार्शल टिटो श्री. केयुस्कू व इटालिय कम्युनिस्ट नेता सिनॉर लोंगो यांनी त्याबद्दल उदासीनता दाखविली. कदाचित् माओ विरोधी पत्रकावर सही करण्याची त्यांची तयारी नसेल. क्रेमलिमचा खरा प्रश्न उजवे किंवा उदारमतवादी कम्युनिस्ट नसून डावे किंवा क्रांतिकारक कम्युनिस्ट हा आहे. आणि हा प्रश्न पेकिंगमध्ये रशियन राज्यक्रांतीचा उत्सव करून रशियाने कम्युनिस्ट मतप्रणालीला धोका दिला असून पेकिंग हेच आता जागतिक क्रांतीचे केंद्र बनले आहे असे घोषित करणारे चीनी कम्युनिस्ट यांचेपुरता मर्यादितपण नाही.

मुख्य प्रश्न आहे उत्तर व्हिएटनाम व उत्तर कोरिया यांचे नेतृत्व स्वीकारलेले आशिआयी कम्युनिस्ट पक्ष व क्यूबाच्या नेतृत्वाखाली असलेले लॅटिन अमेरिकन पक्ष. रशियाने फिडल कॅस्ट्रोला आमंत्रण पाठवले होते. पण क्युबाने आपल्या अध्यक्षाला पाठविण्याचे कबूल केले. शेवटच्या घटकेला त्यांची जागा आरोग्यमंत्र्यानी घेतली. त्यांनी सबंध उत्सवात एकही भाषण केले नाही. रशियन्सनी त्यांना भाषण करण्यास सांगितलेच नाही अशी वदंता आहे. त्याला प्रत्युत्तर म्हणून क्यूबाचे वकील क्रेमलीनच्या खाण्याचे वेळी गैरहजर राहिले. आणि दुसऱ्या दिवशी संचलन झाल्याबरोबर क्यूबाचे शिष्टमंडळ गाशा गुंडाळून निघून गेले.

सुवर्णमहोत्सवाचे वेळी एकही बिकट प्रश्न उपस्थित करण्यात आला नसला तरी ते सुटले आहेत असे मात्र नाही. रशियन नेतृत्व आज अनेक दृष्टीने विभागलेले आहे. लष्करी व मुलकी खर्च यातील कोणास प्राधान्य द्यावे, आर्थिक व राजकीय सुधारणा किती वेगाने अस्तित्वात आणाव्यात, चीन व अमेरिका यांचेशी कशा तऱ्हेने संबंध असावेत, 'शांततामय सहजीवन' व 'राष्ट्रीय स्वातंत्र्य युद्धे' यात कोणाची बाजू घ्यावी हे सर्व यक्षप्रश्न रशियन नेत्यांना सोडवावयाचे आहेत.

सुवर्णमहोत्सवाचे निमित्ताने क्रेमलिनमध्ये होणाऱ्या सत्तास्पर्धेत खंड पडला हे मात्र खरे. पक्षाच्या तरुण सभासदांनी केलेला एक हल्ला ब्रेझनॉव्हने परतवला असला तरी त्यांना कायमचे पराभूत करता येईल का ? या भांडणात पक्षात फाटाफूट तर होणार नाहीना ? सुवर्णमहोत्सव राजकीय स्पर्धास्फोटाचा अंत न ठरता सुरवात ठरण्याची शक्यताच अधिक आहे.

— दि इकॉनॉमिस्ट लंडन, ११–११–६७










